# निबंधमालेचें स्वरूप

## व कार्य.



लेखक.

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.

# श्रीतुकाराममहाराजांचें चरित्र

ग्रंथकार—लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.

मंगलाचरणानंतर १ कालनिर्णय २ पूर्वपीठिका ३ संसारा अनुभव ४ आत्मचरित्र ५ वारकरीसंप्रदायाचा साधनमार्ग ६ तुकोबा ग्रंथाध्ययन ७ गुरुकृपा व कवित्वस्फूर्ति ८ चित्तशुद्धीचे उपाय ९ सगु भक्ति व दर्शनोत्कंठा १० श्रीविठ्ठलस्वरूप ११ सगुणसाक्षात्कार मेघवृष्टि ( उपदेशसार ) १३ चातकमंडळ १४ तुकोबा आणि जिजाद १५ धन्यता व प्रयाण. अशीं या ग्रंथाचीं पंधरा प्रकरणें झालीं आह ( यांत प्रसङ्गानुसार तुकोबांचे अभंग किंवा अभंगपाद यांचीं भर अवतरणें व अवश्य विवरणही दिलें आहे ) ग्रंथांत ७ फोटो दिले आहे पृ० ५३० किं० रु० ३ रु०.

१ न्या० सर नारायणराव चंदावरकर:—'Your biogr phy of Tukaram is attractive in style and matt It holds fast the interest & tempts one to read on' इ० इ०.

२ ना० श्रि० परांजपे:—'I have read your life o Moropant and other works too and have a high regad for your genuine work in Marathi Literature.'

३ गीतारहस्यखंडनकार रा० कोल्हटकर:—'आपण सना धर्माभिमान यत्किंचित् ढिला पडूं न देतां भागवतधर्माचें गोड व मुद्देस विवेचन केलें आहे. कित्येक स्थळें तर अत्यंत चटकदार, बहारीचीं प्रासादिक झालीं आहेत. ग्रंथ सर्वांगसुंदर आहे.'

४ विविधज्ञानविस्तार:—'रा० पांगारकरांची वाणी प्रसंगानुसार प्रेमळ पण खणखणित, भाविक पण चिकित्सक, सरळ पण भेदक, साधी पण वेधक अशी आहे. त्यांच्या वाणीचा ओघ अस्खलित असून तींत श्रद्धेची सौहनी आहे हें कबूल केलें पाहिजे.'

# निबंधमालेचें स्वरूप व कार्य.

( विष्णुशास्त्री यांच्या संक्षिप्तचरित्रासह )



लेखक व प्रकाशक—

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

संपादक 'मुमुक्षु,' पुणें.

आवृत्ति दुसरी.

किं. ८१०.

पौष शके १८४३—जानेवारी १९२२

प्रकाशक—लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, यांनीं पुणें पेठ बुधवार,
मुमुक्षु कचेरीमध्यें प्रसिद्ध केलें.

मुद्रक—लक्ष्मण भाऊराव कोकाटे, यांनीं पुणें पेठ सदाशिव घ. नं.
३०० येथें आपल्या 'हनुमान्' छापखान्यांत छापिलें.



# विष्णुशास्त्री चिपळूणकर.

जन्मः—पुणें, ता. २० मे १८५०.

निबंधमालाः—१८७४–१८८१.

मृत्युः—पुणें ता. १७ मार्च १८८२.

१ सर्व साक्षर महाराष्ट्रीयांस चटका लावून विष्णुशास्त्री चिपळूणकर १८८२ मध्यें आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षीं परलोकीं गेले. त्यानंतर चारच वर्षांनीं माझा न्यू इंग्लिश स्कुलांत शिक्षणार्थ प्रवेश झाला. शाळा त्यावेळीं ऐन भरभराटींत आली होती. बळवंतराव टिळक, माधवराव नामजोशी, गोपाळराव आगरकर, वामनराव आपटे वगैरे नामांकित शिक्षक वरच्या वर्गास शिकवीत असत, पण यांचें सर्वांस नित्य दर्शन होत असून त्यांच्या संगतीनें सारी शाळा स्वाभिमानाच्या वातावरणांत [illegible]त होती. विष्णुशास्त्र्यांची मूर्ति शाळेंत वावरत नव्हती तरी त्यांच्या यशानें गद्र्यांचा व होळकरांचा वाडा ( येथें तेव्हां न्यू स्कूल होतें ) सारा दुमदुमून राहिला होता. शिक्षकांत शिकविण्याचा व विद्यार्थ्यांत शिकण्याचा विलक्षण उत्साह होता. गुरुशिष्यांत अत्यंत प्रेम व आपलेपणा होता. आमच्या शाळेसारखी शाळा नाहीं, आमच्या गुरुजींसारखे गुरुजी दुसरे कोठें नाहींत, येथल्यासारखें शिक्षण कोठेंहा मिळत नाहीं असा यथार्थ अभिमान विद्यार्थीवर्गांत वसत होता. विष्णुशास्त्री स्मृतिरूपानें शाळेच्या कार्याला स्फूर्ति देत होते व टिळक-आगरकरांसारखे स्फूर्तीचे पुतळे प्रत्यक्ष डोळ्यांसमोर वावरत होते, त्यांच्या शिक्षणाचाही अनेकांस लाभ होत होता. त्यावेळच्या विद्यार्थीपणाचें स्मरणही आनंदप्रद व स्फूर्तिदायक होत असतें. अशा त्या विद्यालयांत शिकत असतांना आमच्या विद्यालयाचे मूळ संस्थापक व चालक जे विष्णुशास्त्री त्यांच्या निबंधमालेची प्रथम ओळख मला १८८९ सालीं झाली. पुढील सालीं मॅट्रिक होण्यापूर्वीं निबंधमाला मी पांच वेळ वाचली. पुढें कॉलेजांत गेल्यावर निबंधमालेचे मूळ अंक मिळाले पाहिजेत अशी मनाला लालसा उत्पन्न होऊन

जुन्या बाजारांत अंकांसाठीं मी कैक वर्षे खेटे घालीत असे. बुधवार—आदितवारच्या बाजारांत शोधतां शोधतां एकंदर ७२ अंक मला मिळाले, १२ अंक मिळाले नाहींत. 'निबंधमाला' म्हणून छापलेली जी प्रत मिळते तिच्यांत मुख्य निबंध तेवढे दिले आहेत, पण हे अस्सल अंक पाहिले तेव्हां किती तरी महत्त्वाचा मजकूर त्यांत राहून गेला आहे. असें आढळलें. पत्रव्यवहार, सुभाषित, ग्रंथांवर टीका, विनोदमहदाख्यायिका, भाषापरिज्ञान, चमत्कारिक माहिती, उत्कृष्ट उतारे वगैरेंवरून शास्त्रीबोवांची रसिकता, बहुश्रुतपणा, बुद्धीची व्यापकता वगैरे अनेक गुणांवर ज्यास्त प्रकाश पडतो हें ध्यानांत आलें व शास्त्रीबोवांसारखें पाडास आलेलें दिव्य फळ ऐन वेळीं गळून पडल्यामुळें महाराष्ट्र देशाची व मराठी भाषेची केवढी थोर हानि झाली याबद्दल मनास अत्यंत दुःख झालें व हा विचार मनांत आला कीं अजूनही होतें. असो. १८९४सालीं विष्णुशास्त्री यांचे कनिष्ठ बंधु लक्ष्मणराव यांनीं त्यांचें चरित्र प्रसिद्ध केलें. हें अर्वाचीन पद्धतीनें लिहिलें असून त्यांत, निःपक्षपातीपणानें लक्ष्मणरावांनीं शास्त्रीबोवांच्या व त्यांच्या आनुषंगिक इतर जनांच्या गुणदोषांची चर्चा मोकळ्या मनानें केली आहे. सदर चरित्रग्रंथ अतिशयोक्तिदोषरहित असून मोठा रमणीय झाला आहे. पुण्यास विष्णुशास्त्री यांच्या पुण्यतिथीनिमित्त दरसाल एक समारंभ होऊन त्यांत कोणाचें तरी व्याख्यान होत असतें. १९०४ सालीं मला व्याख्यानासाठीं बोलावण्यांत आलें. मी तेवेळीं पंढरपुरास मोरोपंतांची कविता मूळावरून वाचण्यांत व त्यांच्या चरित्राचीं साधनें जुळविण्यांत गुंतलों होतों. तरी शास्त्रीबोवांविषयींची आपली पूज्यबुद्धि व्यक्त करण्याची संधी गमावणें मला उचित वाटलें नाहीं. त्या प्रसंगासाठीं मीं 'निबंधमालेचें स्वरूप व कार्य' हा टीकालेख लिहून पुण्यास लोकांपुढें वाचला. बळवंतराव टिळक सभेचे अध्यक्ष होते. सर्व निबंध तसाच प्रसिद्ध करण्यास त्यांनीं मला दुसरे दिवशीं सांगतलें. तो निबंध मुंबईच्या 'श्रीसरस्वतीमंदिर' नामक पुस्तकांत तेच वेळीं प्रसिद्ध झाला व आज १८ वर्षांनीं पुन्हा तो स्वतंत्र पुस्तकरूपानें मी मराठी वाचकांस बहुधा जशाचा तसाच सादर करीत आहे.

२ विष्णुशास्त्री चिपळोणकर यांचे पूर्वज रत्नागिरी जिल्ह्यांतील पांवस

गांवचे राहणारे. त्यांचे पांचवे पूर्वज महादाजीपंत यांनीं त्र्यंबकेश्वराजवळचा जो श्रीहर्ष किल्ला त्याची फडणिशी मिळविली. ती त्यांचे पुत्र त्र्यंबकपंत व कृष्णाजीपंत यांजकडे चालली. इ. स. १८०२ मध्यें पुण्यांत होळकर-दंगा झाला त्यावेळीं त्यांची फडणिशी जाऊन त्र्यंबकपंताचे पुत्र हरिपंत हे पुण्यास आले. हे विष्णुशास्त्रीबोवांचे आजे-यांची अत्यंत गरीबी होती. हे रावबाजींचे बंधु चिमणाजी आप्पा यांचे जवळ शागीर्द म्हणून राहिले. इ. स. १८१८ मध्यें पेशवाई संपून आप्पा बाजीरावाबरोबर ब्रह्मावर्तास गेल्यावर त्यांनीं पुण्यांत लहानसें अफूचें दुकान चालवून आपला गुजराणा कसाबसा चालविला. त्यांच्या पोटीं इ. स. १८२४ मध्यें कृष्णशास्त्री जन्मले. हे पुढे अत्यंत बुद्धिमान् व विद्याव्यासंगी निघाले. त्यावेळीं पुण्यास मोरशास्त्री साठे म्हणून एक मोठें प्रस्थ होतें. त्यांजपाशीं यानीं प्राचीन शास्त्रांचें अध्ययन केलें. मोरशास्त्री यांचें पट्टशिष्य म्हणजे कृष्णशास्त्री. त्यांना आपल्या या शिष्याचा मोठा अभिमान वाटे व त्याचा उत्कर्ष व्हावा अशी त्यांची आतुरता होती. त्यांनीं एकदा ठिकठिकाणच्या विद्वानांस व शास्त्रीपंडितांस पुण्यास बोलावून घेतलें व एक मोठी सभा भरविली. त्या सभेंत या गुरु-शिष्यांचा पूर्वपक्ष उत्तरपक्ष झाला. वादांत शिष्यानें गुरूस पराभूत केलें. मोरशास्त्री मोठे उदार मनाचे होते. ‘ शिष्यादिच्छेत्पराजयम् ’ या न्यायानें भर सभेंत आपला पराभव आपल्या शिष्यानें केला हें पाहून त्यांस आनंदाश्रु आले आणि ‘ माझ्या विद्येची सार्थकता झाली ’ असें ह्मणून त्यांनीं आपल्या अंगावरची शाल कृष्णशास्त्री यांचे अंगावर घातली व त्यांस ‘ बृहस्पति ’ ही पदवी सर्व लोकांसमक्ष दिली.

३ आणि कृष्णशास्त्री खरोखरच ‘ बृहस्पति ’ निघाले ! ‘ या उप्पर खांद्यावर शालजोडी टाकून हिंडण्यांत प्रतिष्ठा राहणार नाहीं व इंग्रजी विद्येशिवाय लोकांत बोज राहणार नाहीं म्हणून तूं या राजविद्येचा अभ्यास कर’ अशी मोरशास्त्र्यांनीं शिष्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें कृष्णशास्त्री लवकरच इंग्रजी शिकून तिच्यांत निष्णात झाले व स्पेन्सरमिल्लचे ग्रंथही त्यांस लीलेनें समजूं लागले. इ. स. १८४८ च्या सुमारास पुण्यास इंग्रजी शाळा सरकारनें काढली व कृष्णशास्त्री शाळाखात्यांत जे शिरले ते अनेक

बढत्या घेत घेत अखेरपर्यंत त्यांतच सरकारी नोकरी धरून राहिले. प्रथम वेदाध्ययन; नंतर शास्त्राध्ययन व त्यापुढें इंग्रजी विद्येचा अभ्यास करून शास्त्रीबोवा पुण्यास तत्कालीन विद्वानांत श्रेष्ठपद पावले. आश्चर्याची गोष्ट कीं एवढा विद्वान् व सुबुद्ध पुरुष पण त्याचें आचरण धड राहिलें नाहीं! त्यांना दोन पुत्र व एक कन्या झाली. विष्णुशास्त्री हे शास्त्रीबोवांचे जेष्ठ पुत्र व त्यांचा जन्म पुण्यास ता० २० मे १८५० रोजीं झाला. वडिलांचा कित्ता त्यांनीं विद्वत्तेच्या बाबीशिवाय इतर कोणत्याही बाबींत गिरवला नाहीं! त्यांचे लाड त्यांच्या आजाआजींनीं पाळले व त्यांच्याच बाळबोध वळणाचा व संगतीचा त्यांच्यावर चांगला परिणाम झाला. कृष्णशास्त्री हे चौरस विद्वान् होते. त्यांनीं मराठींत बरीच ग्रंथरचना केली, मात्र ती बहुतेक भाषांतररूप आहे. 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह', अरबी भाषेंतील सुरस ग्रंथ, साक्रेटीसाचें चरित्र, रासिलसचें 'भाषांतर' हे त्यांचे गद्य ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांची 'पद्यरत्नावलि' ही सरस आहे. त्यांचे व्याकरणावरील निबंधही सर्वमान्य आहेत. त्यांचीं भाषांतरें मात्र अतिशय सुबोध व सामान्य वाचकांस सहज समजण्यासारखीं आहेत. मराठी भाषेला त्यांनीं त्यावेळीं चांगलें वळण लावले. कृष्णशास्त्र्यांचें भाषांवर भाषांतर असेल असें वाटत सुद्धां नाहीं. विद्वत्ता व मराठी भाषेचें प्रभुत्व या गुणांत कृष्णशास्त्री हे चिरंजीवापेक्षा खरोखरीच वरचढ आहेत; तथापि स्वातंत्र्यप्रीति, स्वदेशाभिमान व कर्तृत्वशक्ति या आपल्या अंगच्या लोकोपकारक गुणांमुळें विष्णुशास्त्री महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरंजीवपद पावले आहेत.

४ विष्णुशास्त्री यांस उजळणी व लिहिणें वाचणें घरींच शिकविल्यावर व २।३ मराठी शाळांतून फिरवल्यावर इ० स० १८६१ सालीं पूना हायस्कूलांत घातलें. शाळेंत 'यांची वागणूक नियमित, अभ्यासी, गरीब व निबोली असे.' तेथें कृष्णशास्त्री वैजापूरकर म्हणून एक संस्कृत शास्त्री असत, त्यांजपासून विष्णुशास्त्री संस्कृत शिकले व यांना संस्कृतची गोडी त्यांच्या संगतींत लागली. यांचे घरचे समवयस्क विद्यार्थी म्हणजे यांचे चुलते सितारामपंत व कनिष्ठ बंधु लक्ष्मणराव. विष्णुशास्त्री यांना फारसें

कोणांत मिसळायला व बोलायला नको होतें, तरी पण त्यांत माणुस-घाणेपणा नव्हता. आपला अभ्यास बरा कीं आपण बरें असा त्यांचा स्वभाव होता. लांबूनलांबून दुसऱ्यांची थट्टामस्करी किंवा विनोद चालला असला तर मुकाट्यानें पाहून आपले आपल्याच ठिकाणीं ते रिझत असत. कोणीं पुसल्यास मात्र ते आपला अभ्यास संभाळून त्यास मदत करीत. याप्रमाणें क्रम चालला असतां ते १८६५ मध्यें मॅट्रिकची परीक्षा पास झाले. लगेच त्यांस पूनाकॉलेज ( डेकन कॉलेज ) मध्यें घालण्यांत आलें. तेथें त्यावेळीं प्रख्यात इंग्रज कवि जो वडस्वर्थ त्याचे नातु हे प्रिन्सिपाल असून प्रो. कीलहार्न, केरोपंत नाना छत्रे, अनंतशास्त्री पेंढारकर हे नामांकित शिक्षक असत. प्रि. वडस्वर्थ हे फार विद्वान् व आस्थेवाईक असून विद्यार्थ्यांना ज्ञानार्जनाची खरी गोडी लागावी यासाठीं ते मनःपूर्वक झटत. परीक्षा पास होण्यासाठीं हपापलेला कोणी भाडोत्री विद्यार्थी पाहिला कीं ते त्याची चांगली खरडपट्टी काढीत. केरोपंत छत्रे हे तर सर्व विद्यार्थ्यांना अत्यंत प्रिय असत. केरोपंतांसारखा विद्यार्णवांत खोल बुड्या मारणारा, निगर्वी, शांत, सुस्वभावी, प्रेमळ व परोपकारी शिक्षक कोणी झालाच नसेल. विष्णुशास्त्र्यांच्या चरित्रग्रंथांत त्यांचें वर्णन आलेंच आहे, पण त्यांचे दुसरे शिष्य ( व माझे गुरु ) गोपाळराव आगरकर यांच्या तोंडूनही त्यांच्या सौजन्याच्या अनेक गोष्टी माझ्या ऐकण्यांत आल्या आहेत. अशा उत्तम गुरूचा सहवास विष्णुशास्त्र्यासारख्या गुणज्ञ तरुणास झाला हें त्याचें भाग्यच होय. कॉलेजांतल्याशिवाय त्यांना घरीं जें शिक्षण मिळे तेंही थोड्यांनाच मिळणारें आहे. कृष्णशास्त्र्यांना भेटायला घरीं अनेक पंडित येत त्यावेळीं त्यांचा होणारा संवाद ह्यांना आयता ऐकायला सांपडे. शिवाय कृष्णशास्त्री हे दक्षिणाप्राईज कमीटीचे रिव्हायजर असल्यामुळें त्यांजकडे अनेक मराठी ग्रंथ तपासायला येत असत, ते ग्रंथ व त्यावरील परीक्षणही विष्णुशास्त्र्यांना ऐतें वाचायला मिळे. त्यांचा घरचा ग्रंथसंग्रहही चांगला होता. ‘ सर्वसंग्रह ’ मासिकांत तेव्हां वामन, मुक्तेश्वर व मोरोपंत यांची कविता छापून येत असे, ती व दादोबा पांडुरंगांची केकावलीवरील ‘ यशोदापांडुरंगी ’ नामक टीकाही याचवेळीं पाहण्यांत येऊन विष्णु-

शास्त्र्यांना मराठी कवितेची गोडी लागली. १८६७ सालीं पुण्यांत पन्हाळकर बोवा नामक एक वैराग्यशील हरिदास आले होते. त्यांचीं वर्षभर कीर्तनें झालीं. विष्णुशास्त्री नियमानें तीं कीर्तनें ऐकण्यास जात. बोवांचा भर गायनवादनावर विशेष नव्हता; तर त्यांची वाणी रसाळ व वक्तृत्वपूर्ण असून मराठींतील उत्तम आर्या, श्लोक, पदें वगैरे त्यांच्या तोंडून अतिशय निवत. विष्णुशास्त्र्यासारख्या मार्मिक व भावनाप्रधान तरुणावर त्यांच्या कीर्तनाचा ठसा चांगला उमटला. इंग्रजी, संस्कृत व मराठी पुस्तकेंही वाचण्याचा छंद त्यांना मनस्वी लागला. कॉलेजांतील विद्यार्थ्यांत विद्याव्यासंगी असे विष्णुशास्त्री चिपळूणकर व प्रो. श्रीधरपंत जिन्सीवाले हे तेव्हां दोनच निघाले. पुढें पहिले ग्रंथरूपानें विख्यात झाले व दुसरे धर्म व इतिहास यांवरील आपल्या वक्तृत्वपूर्ण व रसाळ व्याख्यानांनीं उत्तम कळकळीचे वक्ते म्हणून महाराष्ट्रांत गाजून गेले. दोघेही समकालीन व समवयस्क होते. दोघांनाही स्वदेशाचा पूर्ण अभिमान होता. दोघेही उत्तम शीलाचे व करारी बाण्याचे होते. दोघेही पुढें लो० बळवंतराव टिळक यांना गुरुस्थानीय झाले. जिन्सीवाले याशिवाय विष्णुशास्त्र्यांचे कॉलेज मित्र म्हणजे विष्णु मोरेश्वर महाजनी व केरोपंतांचे पुत्र कोंडोपंत छत्रे हे होत. महाजनींशीं यांचा मतभेद असूनही एकांत अधिक होत असे. महाजनी टापटिपीचे व सीध्या रस्त्यानें जाणारे होते. शास्त्रीबोवांना गणित विषयाचा कंटाळा व अभ्यास सोडून बाहेरचे विविध ग्रंथ वाचण्याचा छंद अतिशय, यामुळें ते दोनदां परीक्षेंत नापास होऊन मागें रेंगाळले, भाषाविषय व इतिहास हे त्यांचे आवडते विषय, तेव्हां यासंबंधाचे ग्रंथ त्यांनीं बहुत वाचले. मूळची बुद्धि तीव्र, तिला दृढ विद्याव्यासंगानें उजाळा मिळाला. विष्णुशास्त्री कॉलेजांत शिकत असतांनाच बापानें चालविलेल्या शालापत्रकांत त्यांनीं लेख लिहिण्यास आरंभ केला व 'रासेलस'चें भाषांतर पुरें केलें.

५ पांच वर्षे कॉलेजांत राहूनही ते बी. ए. ची परीक्षा पास झाले नाहींत; तेव्हां त्यांनीं अव्यवस्थितपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या बाबा गोखले यांच्या शाळेंत नोकरी धरिली व दोन वर्षे तेथें काम केलें.

१८७१ चे अखेर ते एकदाचे बी. ए. झाले. याच सालीं वेणीसंहार नाटकाचा प्रयोग डेक्कन कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं केला त्यांत धर्मराजाची भूमिका विष्णुशास्त्र्यांकडे आली होती. राजा धर्म पितृतर्पण करीत आहे हा भाग आला, तेव्हां कृष्णशास्त्री समोर बसलेले पाहून श्रोत्यांस जरा मौज वाटली ! १८७३ सालीं कृष्णशास्त्र्यांचे वशिल्यानें विष्णुशास्त्री यांस, महादेव मोरेश्वर कुंटे पूना हायस्कूलचे हेडमास्तर असतांना, हायस्कुलांत उपशिक्षकाची नौकरी लागली. कुंटे यांचें व शास्त्रीबोवांचें कधींच पटलें नाहीं. कुंटे यांची बुद्धि अधिक खोल व व्यापक, पण स्वभावांत आड-दांडपणा फार, शास्त्रीबुवांच्या बुद्धींत ओज व देशप्रीति अधिक पण स्व-भावांत मोकळेपणा कमी. कुंटे लेखक व वक्ते, शास्त्रीबोवा केवळ लेखक. एक फाजील बोलके व म्हणून मोकळे, दुसरे फाजील मौनी व म्हणून थोडे अधिक खुनशी. शास्त्रीबोवांच्या लेखणीच्या सपाट्यांत जो सांपडेल त्याला ते चारी मुंड्या चीत करीत, एरवीं त्यांच्यांत दुसरें बळ नव्हतें. कुंट्यां-च्या वर्तनांत तऱ्हेवाईकपणा होता, शास्त्रीबोवांची चालरीत सभ्यपणाची होती. कुंट्यांचे हाताखालीं शास्त्रीबोवांस पांच वर्षे काढावीं लागलीं. या-नंतर त्यांची बदली १८७८ चे प्रारंभीं रत्नागिरी हायस्कुलांत झाली. तेथें ते १॥ वर्ष राहिले. ता. २० मे १८७८ रोजीं कृष्णशास्त्री हे वया-च्या ५४ वे वर्षी चांगला लौकिक मिळवून व नांव मागें ठेवून गेले. ते नास्तिक होते असें म्हणावयास हरकत नाहीं. विष्णुशास्त्री यांस घरीं आस्तिक-पणाचें व धर्माचें वळण यामुळें मुळींच लागलें नाहीं. ते मिशनरी, बाटे व समाजिष्ट वगैरे लोकांशीं वाद करतांना हिंदु धर्माची कड घेऊन निक-रानें भांडत, तथापि स्वदेशाभिमान हा त्यांचा स्वभावविशेष बनल्यामुळें स्वदेशाची भाषा, स्वदेशाचा इतिहास, स्वदेशाचे उद्योगधंदे यांविषयीं त्यांस जसें प्रेम वाटे तसेंच स्वदेशाचा धर्म म्हणून त्यांविषयीं वाटे. धर्मा-चा त्यांनीं कांहीं अभ्यास केला होता किंवा त्याविषयीं त्याचे रहस्य कळू-न प्रेम वाटत होतें अशांतला भाग मुळींच नव्हता. लक्ष्मणरावांनीं चरित्रग्रंथांत विष्णुशास्त्र्यांविषयीं हेंच मत दिलें आहे व तें त्यांचे ग्रंथ पाहतां यथार्थ वाटतें. निबंधमालेंत कोठें कोठें मंगलाचरण करून देवाचे आभार मानले

आहेत, पण ते औपचारिक वाटतात. त्यांत रसिकता आहे पण धर्म-श्रद्धेचा, भक्तीचा जिव्हाळा त्यांत नाहीं. ज्ञानेश्वरमुकुंदराजापासून तों मोरोपंतांपर्यंत मराठी संतकवींच्या वाणींत जो भगवत्प्रसादाचा रंग आहे, जो धर्मनिष्ठेचा व भक्तीचा ओलावा आहे तो त्यांच्या हृदयांत नव्हता व लेखांतही उतरला नाहीं. त्यांचे सर्व भाव देशभक्तिप्रधान आहेत. ते बापासारखे नास्तिक नव्हते, मात्र धर्माचा औपचारिकपणा त्यांनीं सभ्यपणानें संभाळला आहे, विष्णुशास्त्र्यांच्या बहुतेक अनुयायांत हा उणेपणा तसाच उतरला असून त्यांच्या या नव्या संप्रदायांत स्वदेश व स्वभाषा याविषयीं उत्कट प्रेम पण स्वधर्माविषयीं उदासीनता व क्वचित् उपहासबुद्धि असा प्रकार दृष्टीस पडतो. कृष्णशास्त्री वारल्यावर विष्णुशास्त्री हे नौकरी सोडण्याच्या विचारास लागले. ‘ खाविंदचरणीं मिलिंदायमान होणाऱ्या ’ व ‘ रुपेरी बिडी ’ पायांत वागविणाऱ्या रावसाहेबरावबहादुरांवर त्यांनीं मालेंत जागोजाग जे कोरडे ओढले आहेत त्यावरून दास्यवृत्तीचा त्यांच्यासारख्या बाणेदार, करारी व निःस्पृह प्रकृतीच्या माणसाला केवढा तिटकारा होता हें दिसून येतच होतें. त्यांनीं अखेर संधी सांपडतांच नौकरीचा राजिनामा दिला व पुण्यांत राहून राष्ट्रजागृतीचे अनेक उद्योग सुरू केले. टिळक व नामजोशी हे त्यांस प्रारंभापासून येऊन मिळाले व १८८० सालीं त्यांनीं न्यू इंग्लिश स्कूल उघडलें. सहा महिन्यांतच ५०० विद्यार्थी शाळेंत दाखल झाले. केसरी व मराठा हीं मराठी व इंग्रजी साप्ताहिकें, किताबखाना, चित्रशाळा या संस्थाही त्यांनीं उभारल्या. किताबखान्याच्या कामांत त्यांना शाळिग्राम यांची मदत झाली, पुढें वासुदेवराव जोशीही मिळाले. शाळेला ६ महिन्यांनीं आगरकर व वर्षांतच वामनराव आपटे येऊन मिळाले. पहिल्या वर्षी मॅट्रिकला १६ विद्यार्थी बसले पैकीं १२ विद्यार्थी पास झाले व एकास जगन्नाथ शंकर शेटची पहिली स्कॉलरशिप मिळाली. न्यू स्कूल भरभराटीच्या मार्गाला लागलें. निबंधमालेचे ८४ अंक काढून शास्त्रीबोवांनीं ती बंद केली. वरील उद्योग संभाळून ‘ग्रंथमाला’ काढण्याचा त्यांचा बेत होता. शास्त्रीबोवा शाळेंतली नौकरी संभाळून निबंधमाला काढीत; पण ती वखतशीर निघत नसे,

अनेक अंक मागासत, मध्यें ४थ्या वर्षांत ६ व ५व्यांत ६ अंक मागासले, तेव्हां ६० अंक निघाल्यावर १२ अंक मागें पडल्याचें पाहून सबंध वर्ष त्यांनीं गडप केलें! मासिकांचा नियमितपणा तेव्हां व आतांही पुष्कळांस संभाळवत नाहीं. त्यांत अनेक अडचणी येतात, हें खरें आहे. १८८० सालापासून त्यांच्या कामाचा व्याप वाढला. तो त्यांनीं मोठ्या हौसेनें, उमेदीनें व राष्ट्रहितबुद्धीनें वाढविला. 'स्वतंत्र शाळा, स्वतंत्र वर्तमानपत्रें व स्वतंत्र छापखाना इ० नव्या सृष्टींत आम्ही येऊन पडलों' याबद्दल त्यांना मोठा उल्हास वाटला व त्यांच्या हातून आपल्या देशाची यापुढें फारच मोठी कामगिरी झाली असती. पण १८८२ सालीं कोल्हापूर प्रकरणांत केसरीवर खटला झाला व त्या खटल्याचे धांदलींत असतांना शास्त्रीबोवा मार्चच्या १७ व्या तारखेस साऱ्या पुणें शहरास व महाराष्ट्रास शोकांत लोटून निजधामास गेले. त्यांच्या सर्व संस्था भरभरल्या आहेत.

६. आतां शास्त्रीबोवांची मुख्य कामगिरी म्हणजे त्यांची निबंध-माला, म्हणून मालेविषयीं चार शब्द लिहून पुरें करूं. मालेच्या ८४ अंकांत जे मुख्य निबंध आले ते पुढील अंकांत अनुक्रमानें आले आहेत:—

१ मराठी भाषेची सांप्रतची स्थिति, अंक १
२ प्रस्तुत मालेचा उद्देश, अंक २
३ विद्वत्त्व आणि कवित्व, अंक ३ व ४.
४ संपत्तीचा उपभोग, अंक ५. ५ इतिहास अंक ६।७।८.
६ भाषादूषण, अंक ९. ७ लेखनशुद्धि, अंक १०.
८ वाचन, अंक ११. ९ भाषांतर, अंक १२.
१० लोकभ्रम, अंक १३।१४. ११ ग्रंथावर टीका, अंक १५.
१२ गर्व, अंग १६. १३ वक्तृत्व, अंक १८।१९।२०।२१ २३।२५.
१४ भाषापद्धति, अंक २६।२७. १५ इंग्रजी भाषा, अंक २८। २९।३०।३२.
१६ डॉक्तर जॉनसन्, अंक ३३।३४।३५।३७।३९।४०।४१।४३.

१७ मोरोपंताची कविता, अंक ४५।४६।४७।५२।५४।५५।५६।
५७।५८।५९।६३.

१८ लोकहितवादी, अंक ६४।६५।६६।६७।६८।६९।७०।७१।
७३।७४।७५।७६.

१९ आमच्या देशाची स्थिति, अंक ७७ ते ८४. ( हा इ० स० १९१० सालीं सरकारनें प्रेसआक्टाअन्वयें मना करून सरकारजमा केला. )

पहिल्या वर्षाच्या १२ अंकांत मिळून ९ निबंध आहेत व हे बहुतेक लहान आहेत. दुसऱ्या वर्षांत लोकभ्रम, वाचन, गर्व इ० निबंधही छोटे-खानीच असून वक्तृत्वावरचा निबंध मात्र सहा अंकांवर पसरला आहे. या निबंधांत दयानंदस्वामीप्रभृति सुधारक, कर्तृत्वशून्य वक्ते व चळवळे व नवे प्रार्थनासमाजादि समाज व त्यांचे प्रवर्तक यांवर शास्त्रीबोवांनीं जी टीका केली आहे तिच्यामुळें संतप्त होऊन कोणी 'हितेच्छूनें' मालेवर कांहीं आक्षेप काढले. हितेच्छूचें समग्र पत्र छापून त्याला मालाकारांनीं २४ व्या अंकांत उत्तर दिलें आहे. निबंधमालेच्या सर्वच अंकांना ग्रेट प्रायमर टाईप वापरला आहे. २४अंकांचीं दरमहा पृष्ठें ३६ असून टाईप मोठा व विषय अनेक यामुळें मजकूर थोडाच मात असे. २५ व्या अंकापासून मालेचा मात्र आकार वाढविला असून पृष्ठसंख्या ३२ वर आणून ठेवली आहेत. हा थाट शेवटपर्यंत राहिला. क्राऊनच्या ऐवजीं डेमीअष्टपत्री सांच्याचीं ३२पृष्ठें दरअंकास मिळूं लागल्या पासून मालेचा आकार भारदस्त दिसूं लागला. दोन दोन तीन तीन अंक एकदम काढण्याचा प्रसंग अनेकवार आलेला स्पष्ट दिसतो. तिसऱ्या व चवथ्या वर्षांत इंग्रजी भाषेवरचे ४ लेख, डाक्तर जान्सनवरचे ८ लेख व मोरोपंताच्या कवितेवरचे ३ लेख येऊन ४८ व्या अंकापर्यंत मजल आली. अंक २४।३६।४८ यांमध्यें शास्त्रीबोवांनीं आपल्या प्रतिपक्षीयांस व आक्षेपकांस उत्तरें दिलीं आहेत तीं वाचण्यासारखीं आहेत. अंक ४८ मध्यें 'ज्ञानोदय' व 'दीनबंधु' यांच्या आक्षेपांस उत्तरें देऊन म्हटलें आहे "आमचें पुस्तक चालू आहे कीं बंद पडलें असा अंदेशा वाटण्याची तूर्त स्थिति आली आहे. याचीं कारणें आमच्या वाचकांस माहीत आहेतच. हीं कारणें

इतकीं लागोपाठ व अवचित आलीं कीं आमच्या पुस्तकाचा पाया जर आहे त्यांहून अमंळ लेचापेचा असता व आमच्या वाचकांची व आमची हौस कमी असती तर हाच अंक अखेरचा करून एकंदर कारभार आट-पण्याची पाळी होती! पहिलें कारण स्थलांतर (पुण्याहून रत्नागिरी हाय-स्कुलावर बदली झाल्यामुळें शास्त्रीबोवांस तिकडे जावें लागलें होतें) पण याची नीट व्यवस्था होते तों चालू सालचा नववा आक्ट एकदम पसार होऊन बाहेर पडला! या आक्टानें कोणत्याही जातीच्या अगर धर्माच्या लोकांस चिरड येईल असा मजकूर किंवा सरकारच्या राज्यपद्धतीच्या संबंधानें विरुद्ध विचार हीं दोन्ही मना केलीं आहेत, तेव्हां अर्थात् ज्ञानोदयप्रभृति बंधूंचा व सर्व सामाजिकांचा (आर्यसमाज, प्रार्थना-समाज, सत्यशोधकसमाज इ० चा) शेवटचा निरोपच घेणें आलें; व मेकॉलेप्रभृति देशदूषकांचा जो आम्ही प्रसंगवशात् शक्त्यनुसार समा-चार घेत होतों तोही आतां बेताबातानेंच व्यावा लागेल. या बंधनांचा आम्हीं विचार केला व जुळलेला अंक बहुतेक सारा रद्द करून नव्या रूळीस लागू पडे असा पुन्हा नव्यानें लिहिला पाहिजे असें मनांत आणलें; तेव्हां असा कल झाला कीं हें काम अजीच बंद करणें बरें. पाव-लोपावलीं ॲक्ट चुकविण्याची कसरत करीत मार्गक्रमण करण्या-पेक्षां मुळींच मुक्काम करणें काय वाईट? आमच्या भाषेच्या हितार्थ व देशाच्या कैवारानें झाले तेवढे परिश्रम बस झाले." पण अशी नाउमेद झाली असतां "आक्टाचा अंमल जेथपर्यंत पोचूं शकत नाहीं असे पुष्कळ विषय आहेत, तर तेच हातीं धरून पूर्ववत् क्रम चालवावा" असा शेवटीं शास्त्रीबोवांनीं निश्चय केला व म्हणून निबंधमाला ४८व्या अंका-वरच समाप्त न होतां पुढें चालू राहिली. शास्त्रीबोवांनीं 'मोरोपंताची कविता' हा अंमळ कमी धोक्याचा विषय घेऊन पुढें दोन वर्षें तो लांबविला या गोष्टीचें बीज वरील अवतरणांत आहे. मोरोपंताची कविता या विषयावरचे ११ लेख व त्याच्या पाठोपाठ घेतलेल्या लोकहितवादी-वरचे १२ लेख पाहिले म्हणजे हे निबंध मागील निबंधापेक्षां कां लांबले हें यावरून समजतें. येथपर्यंतचे निबंध शास्त्रीबोवा पायांत 'रुपेरी बेडी'

नाखुषीनें वागवीत असतांना लिहिलेले आहेत. शेवटचा निबंध मात्र ते सेवाशृंखलामुक्त झाल्यावरचा आहे. तो सरकारच्या नजरेस येण्यास ३० वर्षे लागलीं, कारण तो १९१० च्या प्रेसआक्टानें राजद्रोही ठरून मना झाला ! असो. निबंधमालेंतल्या मुख्य निबंधाविषयीं हें झालें. या शिवाय मुख्य निबंधाच्या जागीं मालाकार कधीं कधीं रुचिपालट करण्यासाठीं पुस्तकपरीक्षण घालीत असत. रसातळची ( अमेरिकेमधली ) मराठी भाषा (अंक १७), कीर्तनें यांचें टॅपेस्ट नाटक(अंक २२), पंडितांचा वेदार्थयत्न ( अंक ३१ ), रसायनशास्त्र ( अंक ३८ ) संस्कृत ग्रंथ ( अंक ४२ ), जोतिबाफुले यांची गुलामागिरी ( अंक ४४ ), काव्येतिहाससंग्रह ( अंक ४९ ), अपभ्रष्टचंद्रिका व ज्ञानेश्वरीपरिभाषा ( अंक ५१ ), चार पुस्तकें (अंक ५३); महाजनींचे तारानाटक (अंक ६०) हे शास्त्रीबोवांचे टीकालेख मार्मिकपणाचे आहेत. विनोद व उपहास या अस्त्रांचा त्यांनीं वेळोवेळीं उपयोग करून आपले प्रतिपक्षी चीत केले आहेत. निबंधमालेंत पत्रव्यवहार तेवढा बाहेरचा आहे, बाकीचा सारा विविध विषयांवरचा मजकूर शास्त्री-बोवांच्याच हातचा आहे. मोरोपंतांच्या कवितेवर पत्रव्यवहार फार अधिक झाला असून आपले मुख्य प्रतिपक्षी जे ओक व कानेटकर यांच्या पत्रांत मालाकारांनीं अंक ६२ व ७१ मध्यें दणकून उत्तरें दिलीं आहेत. मालेंतले लेख अत्यंत खोल व गूढ विचाराचे आहेत असें नाहीं, मालाकारांचीं मतें व सिद्धांत सर्वच निरपवाद आहेत असेंही नाहीं, तथापि त्यांची ईश्वरदत्त रसिकता, बहुश्रुतपणा, विनोदपरता या गुणांमुळें त्यांच्या वाणींत जो चटकदारपणा आला आहे, प्रतिपक्षाशीं झगडतांना शक्य तितका समतोलपणा व प्रांजळपणा संभाळून त्यांनीं जो विलक्षण कोटिक्रम उपयोजिला आहे, व सर्वांत मुख्य गोष्ट कीं आमूलाग्र प्रत्येक लेखांत त्यांचा उज्ज्वल स्वदेशाभिमान जो व्यक्त झाला आहे, त्यामुळें निबंधमाला ही मराठी वाङ्मयांत आपलें शाश्वतपद संभाळील याविषयीं शंका नाहीं. शाळापत्रकांत छोटेछोटे लेख लिहितांना विष्णुशास्त्री यांनीं वयाच्या २० व्या वर्षी कालिदास, भवभूति, बाण, सुबंधु व दंडी या कवींवर पांच निबंध लिहिले (हें पुढें 'कविपंचक' नांवानें प्रसिद्ध झालें); २४ व्या वर्षी त्यांनीं

निबंधमालेस हात घातला व तत्कालीन पदवीधर, चळवळे व सत्ताधीश यांच्या रोषातोषांस न जुमानतां त्यांच्या अवकृपेमुळें येणारीं संकटें सोसून ७ वर्षे हें काम अव्याहत चालविलें; व ३१।३२ व्या वर्षी ' स्वतंत्र वर्तमानपत्रें, स्वतंत्र शाळा, स्वतंत्र छापखाना ' हीं अस्त्रें हातीं घेऊन राष्ट्रकार्यार्थ रणवीराप्रमाणें उभे राहून व आशेची तुतारी फुंकून आपल्या निशाणाखालीं राष्ट्रांतले होतकरू तरुण गोळा केले अशा या राष्ट्रकार्यधुरंधर देशभक्ताविषयीं—कितीही मतभेद असले तरी-ज्याला अत्यंत प्रेम वाटणार नाहीं असा मायेचा पूत कोणीही सांपडल असें मला तरी वाटत नाहीं. विष्णुशास्त्र्यांची उज्ज्वल देशभक्ति, त्यांचा उत्साह, त्यांची कर्तृत्वशक्ति, त्यांची वेधकता हे गुण आमच्या या पतित राष्ट्रास प्रोत्साहक होऊन त्याच्या भाग्योदयास कारणीभूत होत आहेत हें पाहून चित्तास समाधान वाटतें.

पुणें, मुमुक्षुकचेरी.
ता. १।१।२२ } लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.



# निबंधमालेचें स्वरूप व कार्य.



ज्यानें मला बारा वर्षांपूर्वीं सरस्वतीमंदिराच्या आवारांत प्रथम आणून सोडलें, व ज्याला मीं प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिलें नसूनही ज्याची प्रवर्तक व प्रोत्साहक वाणी नित्य माझ्या कानांवर पडत, त्या माझ्या परमपूज्य गुरूला—कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, निबंधमालाकार यांना—मी नम्रतापूर्वक प्रणिपात करितों; व त्यांच्याबद्दलची माझी कृतज्ञताबुद्धि अंशतः तरी प्रकट करण्याचा सुयोग आज मला सद्वर्तनप्रवर्तक मंडळीच्या या संस्थेनें आणून दिली, याबद्दल मी या सभेचे मनःपूर्वक आभार मानतों.

## १ शास्त्रीबोवा.

१. शास्त्रीबोवाचें चरित्र नव्यानें सांगण्याचें कांहीं कारण नाहीं, व आज तें सांगण्याचा माझा हेतूही नाहीं. निबंधमाला, न्यू इंग्लिश स्कूल, केसरी, मराठा, चित्रशाळा व किताबखाना या संस्था जोंपर्यंत जिवंत आहेत, तोंपर्यंत शास्त्रीबोवाही जिवंतच आहेत. इतकेंच काय, पण त्यांनीं लावलेल्या वृक्षांची वाढ जोंपर्यंत होत आहे, तोंपर्यंत ते मृत्युलोक सोडूनही आपलें कार्य करीत आहेत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. शास्त्रीबोवांचा देशाभिमान व निःस्पृहता, त्यांची विद्वत्ता व ग्रंथकर्तृत्व हे गुण सर्वमान्य झालेले आहेत; व त्यांनीं लोककल्याणाचा जो मार्ग घालून दिला आहे त्याचें देशकालवर्तमान पाहून अनुसरण करण्याची इच्छा व प्रवृत्ति हळू हळू वाढत आहे, यांत शंका नाहीं. खऱ्या लोकनायकाचें काम करून शास्त्रीबोवांनीं आपलीं तत्त्वें समाजांत रूढविण्याचा जो महदुद्योग केला तो अद्याप लोकांपुढें आहे. खऱ्या लोकाग्रणींची कर्तबगारी त्यांच्या मृत्युबरोबर नष्ट होत नाहीं, तर ते आपणांसारखे दुसरे कर्तबगारीचे लोक निर्माण

---

१ कै. शास्त्रीबोवांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं पुणें मुक्कामीं ता. १४।३।०४ रोजीं दिलेलें व्याख्यान.

करून त्यांचे करवीं आपले इष्ट हेतु तडीस नेत असतात. शास्त्रीबोवांनीं आपलें कर्तव्य तर चोख बजावलेंच, पण महाराष्ट्रांतल्या लोकांसही कर्तव्यतत्पर केलें. ही जी राष्ट्रीय जागृति त्यांनीं केली, ती खुद्द त्यांच्या कर्तबगारीपेक्षांही अधिक मोलाची आहे. वडाचें झाड सहस्रावधि लोकांना शांतिसौख्य देतेंच, पण त्याला अनेक पारंब्या फुटुन दुसरेही त्याच्याचसारखे जोमाचे वटवृक्ष तयार होतात. कर्तबगारीचा लोकनायक वटवृक्षाप्रमाणें अन्य लोकनायक प्रसवणारा असतो. शास्त्रीबोवा याच कोटींतले होते.

## २ परिस्थितीचें आनुकूल्य.

२ शास्त्रीबोवांचे बंधु कै. लक्ष्मणरावजी यांनीं त्यांचें चरित्र नव्या धर्तीवर व पुष्कळ निःपक्षपातानें लिहिलें असून त्यांत त्यांच्या गुणदोषांचेंही विवेचन फार मार्मिकपणानें व बहुजनसंमत होईल, अशाच तऱ्हेनें केलेलें आहे. शास्त्रीबोवांनीं जें कार्य केलें त्याला त्यांची परिस्थिति चांगली अनुकूळ होती. त्यांचे वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर हे लोकोत्तर बुद्धीचे पुरुष असून, मोठे विद्याव्यासंगी व रसिक होते. त्यांचें ग्रंथकर्तृत्व ‘ अनेकविद्यामूलतत्वें, ’ ‘ रासेलस, ’ ‘ अरेबियन् नाइटस्, ’ ‘ पद्यरत्नमाला ’ व शालापत्रकांतले ‘ व्याकरणावरील निबंध ’ यांवरून सर्वांच्या माहितींतलें आहे. कृष्णशास्त्री पूर्ववयांत संस्कृतशास्त्रपारंगत झाले होते व आपले गुरु मोरशास्त्री साठे—कीं ज्यांनीं त्यांना सभेंत वादांत जिंकल्याबद्दल थोरपणानें ‘ बृहस्पति ’ ही पदवी दिली—त्यांच्या उपदेशावरून प्रौढवयांत इंग्रजी शिकून त्यांनीं स्पेन्सरमिल्लप्रभृतींच्या संगतींत उत्तरवय घालविलें. अशा विद्वान् व रसिक ग्रंथकर्त्याकडूनच विष्णुशास्त्र्यांना विद्याव्यासंगाचें बाळकडू मिळालें होतें. वडील विद्वान्; विद्वानांचा सहवास; इंग्रजी, संस्कृत, व मराठी भाषांतले शेंकडों ग्रंथ घरीं वाचावयाची संधी; पंडितांचे वादविवाद ओटीवर रात्रंदिवस ऐकण्याची मुभा; अनेक धडाभोडींचें व चळवळींचें माहेरघर अशा इतिहासप्रसिद्ध पुण्यपत्तनीं अखंड वास; या प्रकारची परिस्थिति. शास्त्रीबोवांचे स्वाभाविक गुण जे—ईश्वरदत्त रसिकता, ग्राहकता, महत्वाकांक्षा व कर्तृत्वशक्ति—त्यांच्या पोषणास फार साह्यकारी झाली. फार काय, पण ज्या संस्थांवर, पुरुषांवर व मतांवर शास्त्रीबोवांची

जन्मभर करडी नजर होती, त्यांचा सार्वत्रिक फैलावही त्यांच्या देशाभिमानासच उत्तेजक झाला. लोकहितवादी, मेकॉले व मिल्ल, कै. माधवराव रानडे व माधवराव कुंटे, खिस्ती मिशनरी, जोतिबा फुले व नानामतवादी समाजसुधारक–यांचीं मतें व यांनीं उभारलेल्या संस्था लोकांची दिशाभूल करीत आहेत, किंबहुना राष्ट्रहितविघातक आहेत, अशी विष्णुशास्त्र्यांची दृढ श्रद्धा होती व यासाठींच त्यांनीं या सर्वांवर पुढें शस्त्र उपसलें. निःस्पृहता व खरी कळकळ यांचा बहुतेक अभाव तत्कालीन कर्त्या मानल्या गेलेल्या पुरुषांत त्यांस आढळून आला. शास्त्रीबोवांची कर्तबगारी बोलकेपणांतच संपली असती तर त्यांचीहि किंमत जास्त झाली नसती; पण वडिलांच्या मुर्वतीखातर इच्छेविरुद्ध बरींच वर्षें वागविलेलें सेवाधर्माचें जूं जेव्हां त्यांनीं झुगारून दिलें व सहा वर्षें प्रतिपादिलेल्या तत्त्वांच्या अनुरोधानें स्वतंत्र शाळा, स्वतंत्र वर्तमानपत्रें, चित्रशाळा व किताबखाना या सारखीं उद्योगधंद्यांची वृद्धि करणारीं स्वतंत्र साधनें जेव्हां त्यांनीं हातीं घेतलीं, तेव्हां हे बोलके देशाभिमानी नसून कर्ते देशाभिमानी आहेत, अशी सर्व लोकसमूहाची खात्री झाली व त्यांजविषयीं जनतेची पूज्यबुद्धि अधिक वाढून मागच्यापेक्षां निराळ्या तऱ्हेचा,–कर्तबगारीचा व तडफदार–हा लोकनायक आहे असें जो तो म्हणूं लागला.

## ३ विध्वंसक व विधायक कार्य.

३. शास्त्रीबोवांनीं आपलीं विशिष्ट मतें फैलावण्याकरितां प्रथम निबंधमाला गुंफण्यास प्रारंभ केला. त्यांनीं या मालेंत दोन कार्यें केलीं. एक पूर्वींच्या दुर्मतांचें खंडन व दुसरें आपल्या मतांचें मंडन. राजाला जसें विरोधकांना दंडावयाचें व स्वकीयांना सांभाळावयाचें अशा दोन्ही कामगिऱ्या करावयाच्या असतात किंवा साधूला प्रवृत्तिपर चित्तवृत्ति आवरून निवृत्तिपर चित्तवृत्तींची जोपासना करावयाची असते, त्याप्रमाणें लोकाग्रणीलाही दुराग्रहांचें व अज्ञानाचें खंडन करून योग्य विचारांचें बीं समाजांत पेरावयाचें असतें. शास्त्रीबोवांनीं निबंधमालेच्या द्वारें ही दुहेरी कामगिरी केली. बालविवाह, जातिभेद वगैरेंवर नव्या पंडितांचा फार राग असे; मराठी भाषेविषयीं, मराठी कवींविषयीं त्यांचे दुराग्रह असत; व ब्राह्मण, भट,

समाजांतल्या मूर्तिपूजादि उपासनेच्या पद्धति यांवर त्यांचा भारी कटाक्ष असे. अशा पंडितांचा शास्त्रीबोवांनीं फार कडक शब्दांनींच समाचार घेतला. लोकहितवादी म्हणजे प्रसिद्ध गोपाळराव देशमुख होत. यांच्याबद्दल शास्त्रीबोवा लिहितात—" ब्राह्मण लबाड, ब्राह्मण मूर्ख, ब्राह्मणांनीं देश बुडविला, पंडितांनीं सातां समुद्रांविषयीं शोध केला नाहीं, हिंदु लोक म्हणजे मेंढरें, संस्कृत विद्या येथूनतेथून अप्रयोजक व वेडगळ, तिची हल्लींच्या काळांत कवडीचीही योग्यता नाहीं, धर्माची स्थिति फार खराब झाली आहे तेव्हां नवा धर्म तयार केला पाहिजे, जुने शास्त्रीलोक व भट्ट हीं सर्व मेलीं पाहिजेत, त्यांस छदाम उचलून देणें म्हणजे निव्वळ पाजीपणा, स्वदेशीय राजेरजवाडे सर्व पशु, भटभिक्षुक लायब्ररीत येऊन ज्ञानसंपादन करीत नाहींत, ग्रंथास उत्तेजन देत नाहींत, पुनर्विवाह सुरू झाला पाहिजे, विलायतची महायात्रा करून आलेल्यांस सर्वांनीं अग्रस्थान दिलें पाहिजे, कर्मकांडाच्या खटपटींत बिलकुल अर्थ नाहीं, सर्व गुणांचें परम निधान म्हणजे काय ते इंग्रज लोक, इ० इ० हें सर्व भारूड लोकहितवादींच्या ध्यानींमनीं आज चाळीस वर्षें वागतें आहे, व ग्रंथ असो, निबंध असो, भाषण असो, कोणताही विषय असो; वरील तत्त्वांचा त्यांत प्रवेश झाल्याखेरीज व्हावयाचें नाहीं ! " लोकहितवादीचे ग्रंथ मीं वाचले आहेत. त्यांत वर दिलेलीं मतें प्रतिपादिलीं आहेत खरीं. इंग्रजीच्या नव्या उजेडानें आमचे लोक प्रथम कसे भांबावून गेले, हें लोकहितवादीचे ग्रंथ वाचिले असतां कळून येतें. मालाकारांनीं त्यांच्या या मतांवर जरी अति कडक टीका केली आहे; तरी त्यांचे सतद्योगोग, समाज सुधारण्याची इच्छा व इतिहासाची उत्कृष्ट माहिती हे गुण त्यांनीं घेतले आहेत. मीं प्रथम लोकहितवादीवरचा निबंध वाचला, तेव्हां लोकहितवादी हे कोणी फार वाईट मनुष्य असावेत असा माझा ग्रह झाला होता; पण कांहीं वर्षांनंतर खुद्द त्यांचे ग्रंथ वाचले तेव्हां त्यांच्याविषयीं मला पुष्कळ आदर उत्पन्न झाला; मात्र त्यांच्या मतांच्या पोरकटपणाबद्दल भारी हंसूं आलें ! लोकहितवादींनीं आपल्या काळांत आपल्या कल्पनेप्रमाणें देश सुधारण्याची कांहीं थोडी खटपट केली नाहीं. यामुळें ते किंवा त्यांच्या आचाराविचाराचे दुसरे जे थोर लोक होते, त्यांच्यावर शास्त्रीबोवांनीं व्यर्थ भडिमार केला

असे कांहीं लोक समजत व अद्याप समजतात. मला वाटतें, शास्त्रीबोवांचा राग व्यक्तींवर नव्हता व विशिष्ट व्यक्तींवर राग उगविण्यासाठीं त्यांनीं कोणतेच लेख लिहिले नाहींत, तर व्यक्ति निमित्तमात्र करून त्यांनीं समाजांत रूढ झालेल्या दुर्मतांचें खंडण मात्र अमळ तिखटपणानें केलें. न्यायमूर्ति माधवरावजी रानडे यांच्या मराठी कविता व मोरोपंतांची केकावली यांवरच्या अभिप्रायांवरही त्यांनीं जी खरमरीत टीका केली, ती माधवरावजीशीं त्यांचें कांहीं वांकडें होतें किंवा मोठ्या मनुष्यावर टीका करून प्रसिद्धि मिळावी म्हणून नव्हे; तर त्यांनीं मराठी काव्यांवर जे अभिप्राय दिले ते त्या काळच्या बहुतेक सुशिक्षित लोकांच्या अभिप्रायांचे व्यंजक होते व हे अभिप्राय मराठी कविता मार्मिकपणानें न वाचणाऱ्या व नवीन अंधपरंपरा चालविणाऱ्या इंग्रजीपंडितांचे होते, यासाठीं ते दूर करणें त्यांना प्राप्त झालें.* माधवरावजींनीं पुढें मराठी कविता १८९० पासून वाचावयास सुरवात केली व महिपति, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम यांचे ग्रंथ अनुक्रमानें वाचून त्यांवर मुंबई शहरांत सुरस व्याख्यानें दिलीं. तीं ज्यांनीं ऐकिलीं किंवा वाचलीं असतील, त्यांना माधवरावजींच्या मतांत किती इष्ट फरक झाला, हें कळलेंच असेल. मालाकार बोलक्या मंडळीवर घसरत: “ आमच्या नूतन पंडितमंडळीनें करावें काय, तर सरकारी हुद्दे मिळवावे, जन्मभाषेची व आपल्या देशाची ओळख विसरून जाऊन पाश्चात्य भाषेंत निरंतर अद्वातद्वा प्रलाप करावे व आपल्या राजकर्त्यांचें सर्व प्रकारें अनुकरण करून मोराचीं पिसें लावून आयता थोरपणा मिळूं पाहणाऱ्यांच्या पंक्तीला बसावें ! ” स्वभाषेसंबंधीं सर्वथा अनास्था, उपेक्षा व उलट निंदा करण्याची प्रवृत्ति तेव्हां पुष्कळ लोकांत होती. मराठी भाषा भिकार, तिच्यांत अर्थव्यंजकता नाहीं, तिच्यांत अनेक शास्त्रीय

---

* “ आमच्या जुन्या मराठी कवितेविषयीं जर पाहिलें तर ती ज्यांनीं वाचली आहे, व यास्तव तीविषयीं मत दिलें असतां ज्यांस कांहीं तरी शोभेल, अशा लोकांपेक्षां, वाचण्याच्या किंवा वाचून समजण्याच्या नांवानें तर पूज्य, पण तिजविषयीं रामबाण मत देणारांत मात्र अग्रगण्य, अशांचीच संख्या फार आहे. ”

[ भाषांतरांवरील निबंध ].

विषयांवर गद्यग्रंथ नाहींत, तिच्यांत इंग्रजीप्रमाणें अनेक विषयवर्णन करणारी सरस कविता नाहीं, म्हणून इंग्रजी शिकलेल्या लोकांची ओरड होती; त्यांस शास्त्रीबोवांनीं उत्तर केलें कीं, अशी आपणच ओरड करणें हें लांछनास्पद आहे; आपल्या मायभाषेंत जे दोष आहेत, ते घालविण्याचा उद्योग सुशिक्षितांनीच केला पाहिजे. " ज्यांनीं स्वभाषेच्या अभिवृद्ध्यर्थ निरंतर उत्साहानें झटावें, त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यताबुद्धी, पंडितंमन्यता वगैरे दोष अखंड वसल्यामुळें तिची मोठी हानि होऊन ती क्षयाच्याच पंथास दिवसेंदिवस लागत चालली आहे. "

४ आपला धर्म, आपला देश, आपला इतिहास, आपलें वाङ्मययांची मिशनरी वगैरे परकी लोक अखंड निंदा करतात व आमच्यांतले सुशिक्षित लोक त्यांचीच झील ओढतात, याबद्दल शास्त्रीबोवांस अत्यंत वाईट वाटे. आमच्या समाजांतले दोष शास्त्रीबोवांनीं झांकून ठेवले नाहींत. संपत्तीचा उपभोग, लोकभ्रम वगैरे निबंधांतून त्यांनीं समाजांतल्या पुष्कळ दोषांचें आविष्करण केलें आहे. त्यांना आपल्या वेळच्या इंग्रजी पंडितांचा जो मनस्वी राग येत असे, तो एवढ्याकरितांच कीं, स्वाभिमानशून्यतेनें त्यांना पछाडलें होतें. आपल्या घरांत कांहीं दोष असले, तर ते सडकेवर मांडून परक्यांस तमाशा दाखवावयाचा व त्यांच्याबरोबर आपणही आपल्या घराची अब्रू चव्हाट्यावर आणावयाची, हा प्रकार अत्यंत असमंजसपणाचा होय. आपल्या घरांतलीं व्यंगें आपण मुकाट्यानें काढून टाकावीं, पण परका मनुष्य जर आपल्या घरांतलीं व्यंगें काढून निंदा करूं लागला, तर त्याचे हात धरून आपण त्याला सांगितलें पाहिजे कीं, ' बाबारे ! घरोघर मातीच्याच चुली आहेत; अगोदर तूं आपलें घर सुधार, माझें घर सुधारण्याला मी स्वतंत्र व समर्थ आहें. ' त्याप्रमाणेंच आपल्या समाजांतले दोष आपणच सुधारावे, त्यांत परक्याला हात घालूं देऊं नये. स्वाभिमानशून्यता ही राष्ट्रविध्वंसक मोठी दुष्ट *राक्षसी

*मोठमोठ्या इंग्रज तत्त्ववेत्त्यांचाही असाच अभिप्राय आहे.

Self-respect is the very essence of national life. A great nation may suffer great disasters and survive

आहे, असें शास्त्रीबोवांचें ठाम मत होतें. ज्या राष्ट्राला आपल्या गतवैभवाचा, आपल्या इतिहासाचा व वाङ्मयाचा अभिमान वाटत नाहीं, त्या राष्ट्राच्या राष्ट्रीयत्वाचा मुख्य आधारस्तंभ डळमळीत झाला म्हणून समजावें, ' असें प्रो. म्याक्स मुल्लर साहेबांचें मत आहे. शास्त्रीबोवांत स्वदेशाभिमानाचें बीं पक्कें मुरलें होतें, यामुळें अभिमानशून्य मंडळींचा त्यांना फार राग येत असे व हे मेषपात्र लोक राष्ट्रहित करावयाला अगदीं असमर्थ आहेत, असें त्यांचें ठाम मत होतें. राष्ट्रांत कोणतेंही कार्य व्हावयाचें असेल तर तें स्वाभिमानमूलक असावें, स्वाभिमानशून्य अशा सर्व चळवळी—मग त्या केवढ्याही मोठ्या मनुष्यानें कितीही सद्‌बुद्धीनें चालविलेल्या असोत—राष्ट्रकार्याला विघातक अशाच असतात. यासाठीं शास्त्रीबोवांचा मुख्य प्रयत्न राष्ट्रांत स्वाभिमान उत्पन्न करण्याचा होता. स्वदेशाभिमान हा सर्व देशसुधारणेच्या उपायांच्या मुळाशीं पाहिजे. स्वतः शास्त्रीबोवा मोठेच देशाभिमानी पुरुष होते. त्यांच्या सर्व सद्गुणांच्या व सत्कृतीच्या मुळाशीं देशाभिमान होता.

५ निबंधमालेचीं जीं दोन मुख्य अंगें विध्वंसक व घटक, त्यांपैकीं पहिल्याचें दिग्दर्शन केलें. दुसरें जे अंग म्हणजे घटनासामर्थ्य त्याबद्दल विशेष विचार करणें हा आजच्या निबंधाचा मुख्य विषय आहे. म्हणजे निबंधमालेनें कोणाकोणाचीं मतें कशीं खोडून काढलीं, याचा मला आज विचार कर्तव्य नसून निबंधमालेचा मराठी ग्रंथ या दृष्टीनें विचार करावयाचा आहे;

---

them, if the spirit of its people remains in tact. The most fatal thing any government can do for a country is to destroy its sense of self-respect and teach it to acquiesce in what is felt to be dishonourable.'

—*S. Laing on 'Modern Science and Modern Thought', page 304.*

'A people that can feel no pride in the past, in its history, and literature loses the main stay of its national character!'

--*Max Muller, Selected Essays, Vol. II, p 18*

म्हणजे निबंधमालेंत शास्त्रीबोवांनीं कोणते विषय घेतले आहेत, त्यांचें कोणत्या हेतूनें कसें विवेचन केलें आहे व अखेर निबंधमालेनें कोणतें कार्य केलें आहे, याचा मुख्यतः आज विचार करावयाचा आहे. ग्रंथ दोन प्रकारचे असतात. कांहीं ग्रंथ असे असतात कीं, वाचकांचें मनोरंजन करून कांहीं विषयांची त्यांस माहिती पुरविली कीं त्यांचें कार्य झालें. दुसरे कांहीं ग्रंथ असे असतात कीं, वाचकांस मनोरंजनाबरोबर कांहीं माहिती देतातच, पण त्यांपैकीं थोड्यांची तरी कार्याकडे प्रवृत्ति करितात व ग्रंथरचनासामर्थ्यही त्यांत उत्पन्न करितात. म्हणजे द्रव्य जसें उत्पादक व अनुत्पादक असतें तसे ग्रंथही अन्य ग्रंथ प्रसविणारे म्हणजे उत्पादक व आपल्या ठायींच विराम पावणारे म्हणजे अनुत्पादक असतात. उत्पादक ग्रंथ फार विरळ असतात, कारण अशांत कांहीं ज्योत असावी लागते. इंग्रजी अंमलापासून मराठी गद्यग्रंथ लहानमोठे पांच चार हजार झाले असतील, पण या पाउणशें वर्षांत उत्पादक ग्रंथ असा एकच झाला आणि तो ग्रंथ म्हणजे निबंधमाला होय. हा ग्रंथ उत्पादक कसा, हें या निबंधाच्या उत्तरार्धावरून कळून येणार आहे.

## ४ निबंधमालेचा हेतु.

६ निबंधमालेचा जन्म इ. स. १८७४ च्या जानेवारींत झाला व तिचे ८४ अंक निघून ती १८८० मध्यें विराम पावली. या सात वर्षांत मालाकारांच्या या लाडक्या कन्येला अनेक दुखणींबहाणीं आलीं, तिच्यावर कांहीं पापग्रहांची दृष्टीही होती, खुद्द तिच्या जनकालाही तिच्या पायीं थोडाबहुत त्रास सोसावा लागला. एकदा तर ही सटवते कीं काय, अशीही भीति उत्पन्न झाली होती; पण जगदीशकृपेनें ही सप्तवार्षिका बाला साऱ्या संकटांतून पार पडली. आतां तर या पाणीदार, अल्लड, धीट, मोहक, मानी व लोकप्रिय अशा बालिकेला महाराष्ट्रशारदेच्या दरबारांत अक्षय्य स्थान मिळालें आहे. शारदाबाईंची तिच्यावर फार प्रीति जडली आहे; तिच्या अनुग्रहानें ती चिरंजीविनी झाली आहे व 'माझ्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत मी तुला अंतर देणार नाहीं,' असेंही तिनें तिला अभिवचन दिलें आहे, असा लोकप्रवाद आहे!

७. असो. निबंधमालेच्या आदिअंतींचे दोन निबंध पाहिले म्हणजे तिचा जन्म कोणत्या हेतूनें झाला, हें समजतें. प्रत्येक चांगल्या ग्रंथाचा कांहींतरी विशिष्ट हेतु असतो, व तो हेतु नीट समजल्यावांचून ग्रंथाचें स्वारस्य कधीं कळत नाहीं. 'आमच्या देशाची स्थिति' हा शेवटचा व 'आमच्या भाषेची सांप्रतची स्थिति' हा पहिला निबंध आहे. पहिला निबंध हा शेवटल्या निबंधाचें मूळ आहे. आमच्या देशाची हीन स्थिति सुधारण्याला आमच्या भाषेची सांप्रतची स्थिति सुधारली पाहिजे, तिच्या द्वारें हरएक प्रकारचें लोकशिक्षण दिलें पाहिजे व देशोद्धाराचा हाच एक राजमार्ग आहे, हा जो मालाकारांचा मुख्य सिद्धांत तो या पुस्तकांतल्या रूपुस्ताच्या दोन निबंधांवरून स्पष्ट होत आहे. हाच अभिप्राय त्यांनीं जागोजाग प्रकट केला आहे. इंग्रज सरकार सर्वप्रकारें बलाढ्य* आहे, व आम्हीं सर्व प्रकारें सध्यां पंगु झालों आहोंत, तेव्हां दांडगाईमुळें बलाढ्य कनिष्ठाला अधिक चेंगरून मात्र टाकील. तर असा अविवेकानें आपण आपल्या पायावर धोंडा पाडून घेणें शहाणपणाचें होणार नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें. आपल्या निकृष्ट स्थितींतून निघण्याचा उपाय मालाकार सांगतात तो असा:—"मनुष्याची किंवा राष्ट्राची सुधारणा करावयाची ह्मटली ह्मणजे तिचा पाया आत्मस्थितीचें पूर्ण ज्ञान हा होय. ज्यास आपली अवस्था काय आहे, पुढें काय होणार, आपलें बळाबळ किती, वगैरे गोष्टींचें चांगलेंसें ज्ञान नाहीं, त्याची स्थिति कधीं सुधारावयाची नाहीं. तर आमच्या लोकांस प्रथमतः स्वतःविषयींचें ज्ञान करून देणें अवश्य होय...साऱ्या जगाची हल्लीं स्थिति काय आहे, अलीकडे निरनिराळ्या संबंधांनीं पृथ्वींतील देशांचे परस्परांशीं व्यापार कसे सुरू आहेत, त्यांत या आमच्या देशाचें इतरांशीं दळणवळण कोणत्या प्रकारचें आहे, आमच्या राष्ट्राची पूर्वीं स्थिति कशी होती व हल्लीं कशी आहे, आपली पुन्हां भरभराट होण्यास कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत इत्यादि विषयांवर सर्वांचा यथार्थ समज होणें हें फार जरूरीचें आहे. हें जोंपर्यंत

* "एकंदरीत देश नाहीं, भाषा नाहीं, धर्म नाहीं. रीतरिवाज नाहीं, असे पोरके राष्ट्र आह्मी सध्यांच्या स्थितींत झालों आहों." (इतिहास)

होणार नाहीं, तोंपर्यंत हल्लींसारखेंच पोकळ लोककल्याण व रिकामी बडबड चालेल व वास्तविक उपयोगाचें असें कांहीं होणार नाहीं. ज्यास आपली प्रकृति नीट करून शरीर दृढ करावयाचें असेल, त्यानें प्रथम आपल्या प्रकृतीचें मान समजून घेणें जसें अत्यावश्यक होय, त्याचप्रमाणें येथेंही प्रत्येक मनुष्यास आपल्या देशाची स्थिति पूर्णपणें लक्षांत येऊन आपलें बळाबळ जेव्हां त्यांच्या पुरतेपणीं मनांत भरेल, तेव्हां आमच्या सुधारणेस आरंभ झाला, असें खास ह्मणतां येईल." हा उतारा अत्यंत महत्त्वाचा आहे. यांत शास्त्रीबोवांच्या सर्व हेतूंचें बीज आहे. इंग्रजसरकाराविरुद्ध आपल्या सारख्या जगाच्या व आपल्या घडामोडींविषयीं पूर्ण अज्ञान अशा राष्ट्रानें एकदम बंडाळी करण्यांत बिलकुल अर्थ नाहीं, त्यापासून तादृश उपयोग होणार नाहीं, नानाप्रकारच्या बोलकेपणाच्या संस्था व सभा काढण्यापासून देशाचा कांहीं फायदा नाहीं, तर राष्ट्रांतल्या सर्व लोकांस आत्मस्थितीचें, जगांतल्या उलाढालींचें व स्वपरबळाबळाचें पूर्ण ज्ञान झालें म्हणजे पुढें देश ऊर्जितावस्थेस आणण्यास आपलें राष्ट्र आपोआप लागेल, असें हें शास्त्रीबोवांचें मत आमच्या चळवळी लोकांच्या मनांत जितकें चांगलें बिंबेल तितकें हवें आहे. शिवाजीरामदासांच्या वेळीं जी राज्यक्रांति झाली, ती एकट्या शिवाजीच्या किंवा एकट्या रामदासांच्या कृतीनें झाली नाहीं; त्यावेळीं शेंकडों शिवाजी व शेंकडों रामदास महाराष्ट्रांत उत्पन्न झाले होते व त्यांची खरी योग्यता यथार्थपणें जाणणारे गुणी विरागी व उच्च मनोवृत्तींचे सहस्रावधि लोक राष्ट्रांत होते. मोठी क्रांति ही उठाउठी होणारी नाहीं. सर्व लोक, सर्व समाज, अठरापगड जातींतले हजारों लोक एका राष्ट्रहिताच्या उदात्त मनोवृत्तींनीं घेरले पाहिजेत व त्यांच्यांतत स्वार्थादि लघुवृत्तींचा पूर्ण लोप झाला पाहिजे. भरतखंडांतल्या लोकांनीं राज्यें मिळविलीं व तीं उत्तम प्रकारें चालविलीं, त्यांना अभिमान बाळगण्यासारखा इतिहास आहे, धर्म आहे, त्यांच्यांत राष्ट्रीयत्वाचीं अंगें आहेत व कालांतरानें भरतखंडाचा सर्व बाजूंनीं महोदय झाल्याशिवाय खास राहणार नाहीं, मात्र उतावीळपणा व अविचार नसावा. तर याप्रमाणें राष्ट्राची अगोदर जागृति करण्याला लोकांना सर्व बाजूंचें शिक्षण मिळालें पाहिजे. हें शिक्षण देण्याचे मार्ग शास्त्रीबोवा सांगतात:—" अज्ञानध्वंसनाचीं अलीकडे जशीं जबरदस्त

साधनें उपलब्ध झालीं आहेत तशीं पूर्वीं कधींही नव्हतीं. छापखाने, आगगाड्या, आगबोटी, डाका, तारायंत्रें वगैरे सर्व अर्वाचीन कलाही युद्धांत कामीं पडणारीं अशीं दिव्य अस्त्रेंच होत असें म्हटलें असतां चालेल. तर या महासाधनांच्या द्वारें आमचा येवढा सारा देश जो कुंभकर्णासारखा निद्रापद भोगीत स्वस्थ व सुस्त होऊन पडला आहे, त्यास हालवून जागें करण्याची प्रथमत: तजवीज झाली पाहिजे...तर देशस्थिति सुधारल्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञानसंपन्न करणें हा होय. ही संपन्नता सिद्ध करण्याचीं दोन मोटीं साधनें म्हटलीं म्हणजे रसना व लेखणी हीं होत. पहिल्या सदराखालीं शाळा व व्याख्यानें येतात, व दुसऱ्याखालीं वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें व ग्रंथ हे येतात."

८. आमच्या या नूतन राष्ट्रवैद्यानें आमच्या राष्ट्रीय आजारावर जीं दोन औषधें सांगितलीं तीं रसना व लेखणी हीं होत. यावर कोणी शंका घेईल कीं, शास्त्रीबोवांनीं बोलक्या व लेखणीबहाद्दर पंडितांवर सारा गहजब उडविला व पुन्हां आपणच आमचे पुढारी बोलके व लेखणीबहाद्दर व्हावयाला पाहिजेत ह्मणून सांगितलें! कोण हा विरोध! यावर असें उत्तर आहे कीं, शास्त्रीबोवांच्या पूर्वीं बहुतेक जिव्हा व लेखण्या परकीयांची अवास्तव स्तुति व आपली अवास्तव निंदा करण्यांत गुंतल्या होत्या. आपल्याच पुढाऱ्यांनीं आपलाच धर्म, इतिहास, भाषा इत्यादिकांची निंदा केली, तर बहुजनसमाजाला कर्तृत्वाचा उल्हास कसा वाटावा? समर्थ मनास उपदेश करतांना 'बा सज्जना मना!' म्हणून गोड भाषेनें त्यास आळवितात, यांतलें बीज काय? कसलाही आडदांड घोडा असला तरी त्याच्या तोंडावर व पाठीवर हात फिरविला व मधुर वाणीनें चुचकारिलें कीं, त्याला उमेद चढते; त्याचप्रमाणें राष्ट्रास व समाजास चुचकारीत चुचकारीत त्यांत आत्मप्रत्यय हिम्मत, उत्पन्न केली पाहिजे व त्यास कार्यतत्पर केलें पाहिजे. समर्थ म्हणतात:—

मुलांच्या चालीनें चालावें । मुलांच्या मनोगतें बोलावें ।
तैसें जनांस शिकवावें । हळू हळू ॥ १ ॥

आपल्या समाजाची हिम्मत आपण होऊन खचविणें यासारखें आत्मघातकीपणाचें दुसरें कोणतें कृत्य आहे? प्रसंगविशेषीं बापानें मुलाचा

कान पिरगाळला पाहिजे, त्याला बोलले पाहिजे, त्याला शिक्षाही केली पाहिजे त्याचप्रमाणें खऱ्या पुढाऱ्यानें प्रसंगीं समाजांतले दोष जाण्यासाठीं त्यांतल्या वाईट गोष्टींवर घसरलें पाहिजे, पण त्याला मुख्यतः काम करावयाचें तें राष्ट्राला चुचकारून त्याला आत्मोन्नतीच्या मार्गाला लावणें हें होय. समर्थांनीं दासबोधांत खरा पुढारी कसा असावा लागतो, त्याचें कर्तव्य काय, समाजसुधारणा त्यानें कोणत्या पद्धतीवर करावयाला पाहिजे याबद्दल जागोजाग फार मार्मिकपणें सांगितलें आहे. राष्ट्राची राजकारणांत, सामाजिक व धार्मिक बाबतींत ज्याला सुधारणा करावयाची असेल त्यानें दासबोधाचीं शेंकडों पारायणें समजून करावीं. ‘ जग तोचि जगन्नायक । कळला पाहिजे विवेका. ॥’ असो; तर शास्त्रीबोवांनीं स्वाभिमानमूलक सर्व सुधारणा पाहिजे म्हणून सांगितलें आहे,तें अगदीं यथार्थ आहे. त्यांनीं जिव्हा व लेखणी हीं जी राष्ट्रहिताचीं दोन मुख्य साधनें सांगितलीं त्यावर दुसरीही एक शंका येईल कीं, ‘ मोठमोठ्या क्रांत्या बिनबोलक्या कर्त्या पुरुषांनींच केल्या आहेत व बोलके लोक प्रसंगीं निरुपयोगी ठरतात’ यावर उत्तर, राष्ट्रोपदेशक हे नेहमींच कर्तेच असतात असें जरी नसलें, तरी कर्त्या पुरुषांला उपयोगीं पडेल अशी राष्ट्रस्थिति हेच निर्माण करितात. शिवरायापूर्वी जे एकनाथ, मुक्तेश्वर, तुकारामप्रभृति संत व कवि झाले त्यांनीं महाराष्ट्राय उदात्त विचारांनीं युक्त व म्हणून कार्यक्षम कसें केलें, हें इतिहासज्ञांस सांगणें नकोच. खुद्द इंग्लंडच्या इतिहासांत‘लेखणी व रसना’ यांनीं केवढालीं कार्यें केलीं, हें प्रसिद्ध आहे. लेखणी व रसना यांचें सामर्थ्य सामान्य नव्हे. एका व्हाल्टेरच्या लेखणीनें फ्रान्स देश कसा खडबडून जागा केला व फ्रान्सच्या राज्यक्रांतीनंतर बर्कच्या लेखांनीं व व्याख्यानांनीं युरोपांतल्या राजांचे डळमळणारे मुगुट त्यांच्या डोक्यांवर कसे टिकूं* दिले, हें इतिहासांत प्रसिद्ध आहे. असो; तर सर्वकाळीं रसना व लेखणी यांचें सामर्थ्य राष्ट्रोदयाला अत्यंत उपयोगीं पडतें व

* ‘Upon all the trembling Kings of Europe, the ‘French Revolution’ fell like rain after long draught’
—*Gosse on English Literature.*

शास्त्रीबोवांनीं देशोद्धाराचीं हींच दोन मुख्य अंगें आहेत म्हणून त्यावेळीं सांगितलें, तें अगदीं युक्त आहे.

९ आमच्या सुशिक्षित पुढाऱ्यांनीं आपल्या रसना व जिव्हा यांच्या द्वारें लोकांस कोणतें शिक्षण द्यावें; वर्तमानपत्रें, मासिकें, ग्रंथ यांना विषय कोणते असावे, याबद्दल शास्त्रीबोवांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे, त्यांपैकीं एकदोन उतारे पुढें देतों:—भाषापद्धति या निबंधांत ते म्हणतात —" इंग्लिश भाषेंत ज्याप्रमाणें हरएक उपयुक्त व मनोरंजक विषयावर शेंकडों बालबोध ग्रंथ झालेले आहेत व प्रतिवर्षीं तयार होत आहेत, तसेंच इकडील देशभाषांतून जर होतील तर सहस्रावधि लोकांस अल्पायासानें, अल्पकाळानें व अल्पअर्थानें पुष्कळ ज्ञान करून दिलेसें होईल. पदार्थविज्ञानाच्या ज्योतिष, रसायन, दर्शनानुशासन, भूगर्भशास्त्र, यंत्रशास्त्र इत्यादि निरानिराळया शास्त्रांवर, तसेंच इतिहासादि विषयांवर व अनेक लौकिक विषयांवर जर सुबोध ग्रंथ लोकांस वाचावयास मिळतील, तर हल्लीं सामान्य गोष्टींचेंही लोकांत जें लज्जास्पद अज्ञान दृष्टीस पडतें तें दूर होईल; व विद्यानंदाचा खरा अनुभव घडून आपले सर्व प्रकारचे हक्कही लोकांस कळूं लागतील. " तसेंच जान्सनवरच्या निबंधांत ते म्हणतात—" तरुण जनांस वाचण्यालायक अशीं नानाप्रकारचीं मनोरंजक पुस्तकें, बहुश्रुत लोकांच्या उपयोगीं पडण्यासारखे तऱ्हेतऱ्हेच्या माहितीचे चमत्कारिक ग्रंथ, विद्यार्थ्यांस उपयुक्त असे देशोदेशींचे इतिहास, निरानिराळया शास्त्रांवर सुबोध ग्रंथ. त्याप्रमाणेंच या देशांतील जुनी कविता व जुना इतिहास यांचा संग्रह,—कीं जो होण्याची सोय दिवसेंदिवस कमी होत चालली आहे,—तसेंच साऱ्या भारतवर्षीयांच्या, किंबहुना साऱ्या जगाच्या प्रीतीचें व पूज्यबुद्धीचें स्थान झालेली जी प्राचीन गीर्वाण भाषा—तींत काय काय ज्ञानभांडार आहे, तिच्या खालोखाल मानलेली जी फारशी भाषा तींत काय मौज आहे; याविषयीं शोध; हिंदुस्थानी, गुजराथी वगैरे एतद्देशीय भाषांचा मराठीशीं कितपत संबंध आहे, व्याकरणरीत्या सर्वांचा कसा कसा मेळ आहे, याविषयीं विचार; या प्रकारें उद्योग करण्याचें आमच्या पुढारी मंडळीनें जर मनावर घेतलें असतें तर आजला लोकांची किती निराळी स्थिति असती! यासारखेंच

देशी शेतीकडे व देशी व्यापाराकडे जर कोणीं लक्ष दिलें असतें, व आपल्या इंग्रजी ज्ञानाचा लाभ आपल्या देशबंधूंस त्यांच्या भाषेच्या द्वारें करून दिला असता व व्यावहारिक कृत्यांच्या संबंधानेंही त्यांस उपयुक्त माहिती करून दिली असती तर त्यांस व सर्वांस केवढें भूषण झालें असतें ! " या दोन्ही महत्त्वाच्या उताऱ्यांत वाङ्मयाची अत्यंत व्यापक कल्पना स्पष्ट दिसत आहे व महाराष्ट्रसारस्वत असल्या बाबतींत अगदीं मागें असल्यामुळें तें वाढविण्याची शास्त्रीबोवांनीं योग्य दिशा दाखवून दिली आहे. मराठी भाषा कविताविषयांत चांगलीच संपन्न आहे. गद्य-ग्रंथ मात्र मराठींत नांव घेण्यासारखे अजूनही झाले नाहींत. स्वतः शास्त्रीबोवांनीं मेकॉलेच्या पद्धतीचेंच पूर्ण अनुकरण करून ॲडिसनाचें काम केलें आहे; पण अद्याप मराठी भाषेला नाट्याचार्य शेक्सपीअर, इतिहासकार गिबन, कोशकार वेब्स्टर, कादंबरीकार स्कॉट, असले ग्रंथ-कार मिळावयाचे आहेत. इंग्रजी व युरोपांतल्या इतर अभियुक्त भाषा गद्यरचनेच्या कामांत किती पुढें गेल्या आहेत, याची अद्याप आमच्या-कडील पुष्कळ विद्वानांस कल्पनाही नाहीं. रिव्ह्यू ऑफ् रिव्ह्यूज्च्या योग्य-तेचें मासिक पुस्तक मराठींत निघण्याला अद्याप किती अवकाश आहे ! मराठी भाषा दुबळी नाहीं, तिच्यांत माधुर्य, प्रौढी हे गुण आहेत, हव्या त्या विषयावर मराठींत ग्रंथरचना करितां येईल इतक्या योग्यतेची ती आहे, यांत मुळींच शंका नाहीं. पण इंग्रजी, फ्रेंच वगैरे पाश्चात्य भाषांत जे विविध विषयांवर अनेक सुंदर गद्यग्रंथ आहेत तशा पद्धतीचे गद्य ग्रंथ मरा-ठींत नाहींत. ही उणीव भरून काढण्याचा एकच मार्ग आहे, आणि तो हा कीं, इंग्रजी, फ्रेंच वगैरे भाषांतल्या गद्यग्रंथांशीं चांगला परिचय करून घेण्या-इतकें त्या भाषांचें ज्यांस ज्ञान आहे त्यांनीं इंग्रजी धर्तीवर मराठींत स्वतंत्र ग्रंथ करून मायभाषेचें दारिद्र्य घालविण्यासाठीं निःस्वार्थबुद्धीनें कंबर बां-धली पाहिजे. एकीकडे गीर्वाण भाषा व एकीकडे इंग्रजी भाषा या दोन विस्तृत व खोल तलावांतून निरालस्य, निःस्पृहता, उल्हास, निरपेक्षता, रसिकता, स्वाभिमान, आस्था व प्रेम या आठ बैलांची मोट लावून रात्रं-दिवस मराठी भाषेच्या उपवनास निरनिराळ्या विषयांच्या निरनिराळ्या पाटांतून पाणी पोंचविलें पाहिजे, म्हणजे तेजस्वी व स्वतंत्र ग्रंथवृक्षांच्या

सुखशीतल छायेंत बहुजनसमाज आराम पावेल! विष्णुशास्त्री यांना संस्कृत व मराठी भाषांची परम प्रीति होतीच, पण इंग्रजी भाषेचें महत्त्वही तें ओळखून होते. पहिल्याच निबंधांत खालील वाक्य आहे—" इंग्लिश भाषेचा आम्ही द्वेष करीत नाहीं; हें तर काय, पण आपल्या मराठीच्या उत्कर्षास ती मोठेंच साधन होईल, अशी आमची खात्री आहे. सर्व जगांतील ज्ञानभांडार तींत सांठविलें असल्यामुळें तिचें साहाय्य मराठी-सारख्या परिपक्क होऊं पहाणाऱ्या भाषेस जितकें होईल तितकें थोडें आहे. इतकेंच मात्र कीं, तें ज्ञानभांडार आपलेसें करून घेण्यास आपल्या भाषेचें स्वत्व म्हणजे निराळेपण कायम राखलें पाहिजे......इंग्रजींतील केवळ अर्थ मात्र घेऊन त्यास शुद्ध मराठीच्या सांच्यांत त्यांनीं ओतलें पाहिजे." मराठी भाषेच्या अभिवृद्धीस इंग्रजीचा आज अतोनात उपयोग करून घेतां येणार आहे; पण मूळ संस्कृताची कास सोडून चालावयाचें नाहीं:— " मराठींत प्रवीण होऊं पाहणारास निदान काव्यव्युत्पत्तीपुरतें तरी संस्कृत भाषेचें ज्ञान अवश्यमेव हवेंच; कारण दोहोंचा संबंध निकट असल्यामुळें मूळच्या भाषेशिवाय चालू भाषचें ज्ञान पुरेतेपणीं होणें कठीण आहे. " इंग्रजीचा अतोनात उपयोग मराठीच्या अभिवृद्धीस होण्यासारखा आहे, हें जरी खरें, तरी मराठीवर इंग्रजीचें वर्चस्व होऊं देतां उपयोगाचें नाहीं. नाहींतर ज्याला मदतनीस म्हणून बोलावयाचें तोच अधिक शिरजोर होऊन मुख्य यजमानास धाब्यावर बसवावयाचा! अहमदनगर आणि विजापूर यांच्यांत जेव्हां चुरस झाली तेव्हां विजापूरसंस्थानानें जवळच्या बलाढ्य अशा विजयानगरच्या हिंदु-संस्थानास साह्यार्थ बोलाविलें असतां विजयानगरच्या राजानें विजापूरच्या मदतीस जाऊन त्याच्याच राज्यांत बंडाळी मांडली! म्हणजे मुसलमानी तंबू छायेंत असतील ते उपटून टाकून तेथें आपले रोंवावयाचे, अन्नाच्या सवा खंडणी मागावयाची, मशीदींस व काजींस उद्वेग वाटेल अशा जुलमाच्या क्रिया करावयाच्या असा त्यानें क्रम ठेवला. शेवटीं विजापूरच्या बादशहास 'भीक नको पण कुत्रा आवर' असें होऊन बिचारा गोंधळून गेला!! तर 'अंगापेक्षां बोंगा जड' असें म्हणावयाचा प्रसंग मराठी भाषेवर न येईल इतक्याच बेतानें इंग्रजीची

मदत आपण घेतली पाहिजे. इंग्रजी भाषेचा मराठीवर पगडा बसणार नाहीं व तिचें स्वत्व जाणार नाहीं, अशा बेतानें इंग्रजींतल्या गद्यपद्याच्या अनेक सुंदर तऱ्हा मात्र मराठी ग्रंथकारांनीं मराठींत आणाव्या, याबद्दल शास्त्रीबोवांनीं ' भाषादूषण ' वगैरे निबंधांत चांगलें विवेचन केलें आहे.

१० आपली रसना व लेखणी देशोद्धाराच्या कामीं खर्च करणाऱ्या पुढाऱ्यांनीं आपलें कर्तव्य निरपेक्षबुद्धीनेंच बजावलें पाहिजे. ग्रंथकर्त्यांविषयीं शास्त्रीबोवा लिहितात—" आमच्या ज्ञानहीन व धनहीन देशांत ग्रंथरचनेपासून फलनिष्पत्ति होण्याचा कितपत संभव आहे, हें जाणून मुख्यत: देशहितबुद्धीनेंच आपलें काम आपण बजावलें पाहिजे. भाषारूप उपवनास आपल्या ज्ञानोदकाचें सिंचन निदान आरंभीं तरी त्यांनीं निरपेक्षबुद्धीनेंच केलें पाहिजे. कालेंकरून त्यांच्या श्रमांचा परिपाक कीर्तिरूप सुमनांनीं व अर्थरूप फलांनीं प्रकट होईलच होईल; पण त्या अदृष्ट लाभावर नजर न देतां पहिल्यानें केवळ आपलें कर्तव्य म्हणूनच त्यांनीं हातांत लेखणी धरली पाहिजे. खडकाळ डोंगराची चढण मोठी कठीण असते, तसाच लोकप्रसिद्धीचा मार्गही परम विषम होय. तो क्रमण्यास मनुष्यानें एकदां कंबर बांधली म्हणजे मग कितीही अडथळे आले तरी त्यानें धैर्य सोडतां कामास नाहीं. " लोकशिक्षण हें आपलें पवित्र कर्तव्य समजून तें निरपेक्षतेनें बजावणारे ग्रंथकार राष्ट्राचे खरोखरीचे पुढारी होत.

११. येथपर्यंत निबंधमाला काढण्यांत शास्त्रीबोवांचा काय हेतु होता, तो बहुधा त्यांच्याच शब्दांनीं सांगितला. त्याचाच सारांश पुन्हा थोडक्यांत सांगतों. " आपल्या देशावर सध्यां परकीयांची सत्ता आहे व खेदाची गोष्ट कीं तींतून मुक्त होऊन आपल्या देशास पुन्हा डोकें वर उचलण्याचा प्रसंगही लवकर येईलसें वाटत नाहीं. सध्यांच्या अत्यंत कष्टावस्थेंत इंग्रजांच्या तरवारींच्या तिखट धारांशीं दयार्द्रतेचा जो कांहीं थोडाबहुत अंश मिश्रित असेल, तेवढाच बहुतकरून आम्हांस त्राता उरला * आहे " कांहीं कालपर्यंत तरी पारतंत्र्याचें जूं आपल्या माने-

* ' इतिहासावरचा निबंध. '

वरचें हालत नाहीं, तेव्हां अपरिहार्य स्थितीबद्दल नित्य रडत बसण्यांत कांहीं हांशील नाहीं. इतकेंच काय, पण प्राप्त झालेल्या स्थितिविशेषाचा फायदा घेऊन आपल्या राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करण्याचे प्रयत्नास पुढारी व विद्वान् लोकांनीं लागलें पाहिजे. आपल्या राष्ट्रांतल्या सर्व लोकांचें आपल्या व जगाच्या उलाढालींविषयींचे समज यथार्थ बनले पाहिजेत. हें होण्यासाठीं सध्यां देशाभिमानी पुरुषांनीं आपल्या लोकांत स्वाभिमान व कर्तृत्व जागृत होतील, अशा बेतानें अत्यंत निरपेक्षतेनें आपल्या 'रसना व लेखण्या' राष्ट्रकार्यार्थ वाहिल्या पाहिजेत व लोकांना आत्मस्थितीचें अगोदर पूर्ण ज्ञान करून दिलें पाहिजे. इंग्रजी भाषा व संस्कृत भाषा यांच्या साह्यानें मराठी भाषा सुधारली पाहिजे व तींत काव्यें, इतिहास, चरित्रें, नानाविध शास्त्रें, कलाकौशल्य यांवर तऱ्हेतऱ्हेचे चमत्कारिक ग्रंथ निर्माण करून तिला संपन्न केली पाहिजे. "भाषेची अभिवृद्धि ही देशाच्या उत्कर्षाचें एक मोठेंच साधन असून तें प्रयत्नाधीनही बरेंच आहे," यास्तव राष्ट्रांतल्या सर्व लोकांस आपल्या देशांतल्या व पृथ्वीवरच्या सर्व देशांतल्या शेती, व्यापार, कलाकौशल्य, वाङ्मय, राजकारण या संबंधाच्या चळवळी यथार्थत्वानें शिकविण्याचें काम राष्ट्रांतल्या थोर पुढाऱ्यांचें आहे व ही प्रवृत्ति राष्ट्रांत उत्पन्न करण्यासाठींच निबंधमालेचा जन्म झाला आहे. मालेच्या जन्माचा हा हेतु पूर्णपणें मनांत बिंबला म्हणजे तिच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होईल.

## ५ मालेचें स्वरूप—मुख्य निबंध.

१२. निबंधमालेचा हा हेतु नीट ध्यानांत धरिला म्हणजे तींतल्या सर्व निबंधांची खरी उपपत्ति लावतां येते. मुख्य निबंधांची संख्या सुमारें वीस आहे. इंग्रजी भाषा, भाषादूषण, लेखनशुद्धि, भाषापद्धति, भाषांतर व मराठी भाषेची सांप्रतची स्थिति, हे सहा निबंध भाषाविषयपर आहेत; इतिहास, वाचन, वक्तृत्व, विद्वत्व आणि कवित्व, ग्रंथावर टीका, जान्सनचें चरित्र व मोरोपंताची कविता हे सात निबंध वाङ्मयात्मक व चर्चात्मक आहेत; लोकहितवादीवरचा निबंध खंडणपर आहे; आमच्या देशाची स्थिति, संपत्तीचा उपभोग व लोकभ्रम हे तीन निबंध सामा-

जिक आहेत; आणि गर्व हा निबंध मानसशास्त्रांपैकीं आहे. येणेंप्रमाणें निबंधांचें वर्गीकरण करितां येतें. हें म्हणजे अगदीं मारवाडी कांटा हातांत धरून केलें आहे, असें कोणीं समजूं नये. तसें करणें प्राय: शक्य नाहीं; पण सामान्यत: असें म्हणतां येईल कीं, निबंधमालेंतले निबंध कांहीं भाषाविषयात्मक, कांहीं वाङ्मयात्मक व चर्चात्मक, कांहीं सामाजिक, एक प्रचलितमतखंडनपर व एक मानसशास्त्रांतला आहे. या सर्व निबंधांचा समुच्चयानें विचार केला म्हणजे असें दिसतें कीं, हे निबंध बेकनच्या निबंधांसारखे सूत्रात्मक नाहींत, जॉन्सनच्या निबंधांप्रमाणें गहनविचारपरिप्लुत नाहींत, ह्यूमच्या निबंधांप्रमाणें समाजशास्त्रावर व मानसशास्त्रावर अति खोल विचार करून लिहिलेले नाहींत व ॲडिसनच्या निबंधांप्रमाणें बहुधा केवळ लौकिक विषयांवर लिहिलेले नाहींत.—तर ज्यावर मालाकारांनीं शतश: प्रहार केले व ज्याचीं मतें खोडून टाकण्यांत त्यांनीं पराकाष्ठा केली त्या मेकॉलेच्या निबंधांच्या धर्तीवर हे निबंध बहुधा लिहिलेले आहेत! या निबंधांत ॲडिसनाचा बालबोधपणा व मेकॉलेचा तिखटपणा आहे. मानसशास्त्रांतला एक मौजेचा सिद्धांत असा दिसतो कीं, ज्या विषयाचा मनाला ध्यास लागतो—मग तो प्रेमबुद्धीनें लागो किंवा द्वेषबुद्धीनें लागो—त्याचे अत्यंत बलवत्तर संस्कार नकळत व इच्छा नसतांही मनुष्याच्या मनावर होतात. ‘ज्याचें जया ध्यान। तेंची होय त्याचें मन’ हें तुकोबांचें वचन या दृष्टीनें खरें आहे. भागवतांत भिंगुरटी भ्रमराचें ध्यान करितां करितां भ्रमर होते हा दृष्टांत, साधु ध्यानानें ईश्वरस्वरूप होतो, हें सिद्ध करण्यासाठीं दिला आहे. कंसादि दुर्जनांचीं मनें कृष्णमय झालीं होतीं म्हणून अंतीं प्रल्हादादि सद्भक्तांना जी गति मिळाली तीच त्यांना मिळाली, असें संतांचें वाक्य आहे. यासंबंधीं ज्ञानेश्वरींतल्या खालील ओंव्या मनन करण्यासारख्या आहेत:—

हेंचि कवणें एकें मिसें। चित्त माझे ठायीं प्रवेशे।
येतुलें हो मग आपैसें। मीच होणें असे॥ १॥
अगा वरी फोडावयाचि लागीं। लोहो मिळो कां परिसाचे आंगीं।
कां जे मिळतिये प्रसंगीं। सोनेंचि होईल॥ २॥

पाहे पा वल्लभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनाचि निजें ।
मज मिनालिया काय माझें । स्वरूप नव्हती ? ॥ ३ ॥
ना तरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ।
कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ? ॥ ४ ॥
नारदा ध्रुवा अक्रुरा । शुका हन सनत्कुमारा ।
इयां भक्ति मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥ ५ ॥
तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें ।
येरां घातकां मनोधर्में । शिशुपालादिकां ॥ ६ ॥
आणि भलतिया जाति जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें ।
परि भक्ता कां वैरिया व्हावें । माझियाची ! ॥ ७ ॥ अं-९.

या सुरस उताऱ्यांत वर सांगितलेलें मानसशास्त्रांतलें गूढ तत्त्व उदाहरणांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. मेकॉलेसंबंधानें शास्त्रीबोवांचीही अशीच स्थिति झाली आहे. कॉलेजांत शिरण्यापूर्वीपासून त्यांची मेकॉलेशीं दोस्ती जुळली होती. हा त्यांचा स्नेह चिरकाल राहिला ! निबंधमालेंत मेकॉलेच्या विचारांची व टीकापद्धतीची इतकी हुबेहुब नक्कल केलेली आढळून येते व मेकॉलेचा कोटिक्रम, त्याचा तिखटपणा, एखाद्यावर घसरलें कीं त्याला पूर्णपणें चीत करण्याची तऱ्हा, गरुड पक्ष्यासारख्या सारस्वताच्या अनेक शाखांत भराऱ्या मारून लेख बहुश्रुतपणानें, विविध माहितीनें, सफाईदार, सोप्या व जोरदार भाषेनें चित्तवेधक करण्याची हातोटी, वगैरे गुणांचें निबंधमालेनें इतक्या आश्चर्यकारक रीतीनें अनुकरण केलेलें दृष्टोत्पत्तीस येतें कीं, निःपक्षपाती मनुष्यास मेकॉलेच्या निबंधांचें निबंधमालेनें शिष्यत्वच पत्करिलें आहे असें वाटतें.* निबंधमालेला

---

*मेकॉलेच्या मिल्टनवरील निबंधाच्या पूर्वभागाशीं पुढील उतारा ताडून पाहण्यासारखा आहे—" सहृदयता ह्मणजे अंतःकरणाचा कोमळपणा तरुणवयांत मनुष्यांत फार असतो. तसाच अर्थात् अज्ञानावस्थेंत, असणाऱ्या राष्ट्रांतही फार असतो. ह्मणूनच लहान वयांत......नाटकें कादंबऱ्या, काव्यें, यांचा अतोनात नाद असतो राष्ट्राच्या आद्यावस्थेंत उत्कृष्ट कविता उदयास पावते...विचारशक्तीचें प्राबल्य होऊन कवित्वाचा ऱ्हास होतो. " [ विद्वत्त्व व कवित्व. ]

मुख्यतः इंग्रजी वाङ्मयापासून स्फूर्ति झालेली उघड दिसते. कालिदासादि मध्यकालीन कवि जसे शास्त्रीबोवांच्या पुरे ओळखीचे झाले होते, तसा व्यासवाल्मीकादिकांशीं त्यांचा दूरचाही परिचय झालेला दिसत नाहीं. मराठी कवितेशींही त्यांचा त्यांच्या काळाच्या मानानें बेताचाच परिचय झालेला होता. नाहीं म्हणावयाला मोरोपंतांची कांहीं कविता त्यांनीं वाचली होती, असें मोरोपंतांवरील निबंध, निबंधांतले प्रासंगिक उल्लेख व उत्कृष्ट उतारे या सदराखालचे मोरोपंतीं वेंचे यावरून दिसतें. ज्ञानेश्वरी परिभाषा व तुकारामाचे निवडक अभंग या पुस्तकांवर शास्त्रीबोवांनीं जी टीका केली तींत मुख्य विषयासंबंधीं इतकी थोडी माहिती आहे व अवांतर व्याख्यान—माहितीनें व सूचनांनीं भरलेलें खरें—इतकें विस्तृत आहे कीं, त्यानेंच सारे टीकालेख भरून गेले आहेत. एकंदरींत, नवनीतापलीकडे मराठी कवितेशीं त्यांचा विशेष परिचय होतासें दिसत नाहीं. त्यांनीं इतर अनेक विषयाप्रमाणें मराठी कवितेचाही कांहीं भाग वरवर चाळलेला आहे, पण मराठी कवितेसंबंधीं त्यांचे प्रसंगोपात्त जे उद्गार आले आहेत, त्यांवरून या विषयासंबंधीं त्यांनीं अवश्य तितका व्यासंग ठेवला नव्हता, हें उघड दिसतें. हिंदुस्थानच्या किंवा मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं मात्र त्यांनीं बरेच ग्रंथ पाहिले होते; पण तेही बहुतेक इंग्रजीच होते. इतिहास हा त्यांचा अत्यंत आवडता विषय असून त्यांच्या विस्तृत इतिहासवाचनामुळेंच मालेला बहुश्रुतपणा व मनोरंजकता हे गुण प्राप्त झाले आहेत. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच कीं, त्यांच्या वाचनापैकीं बहुतेक ग्रंथ इंग्रजी व कांहीं थोडे संस्कृत व त्यांहून फार थोडे मराठी होते. यामुळें त्यांच्या लेखांला, विचारांला व पद्धतीला इंग्रजी वळण पुष्कळच लागलें

---

शुद्ध इंग्रजी वळणही निबंधमालेस पुष्कळ लागलें आहे. याबद्दल आणखी एक उतारा देतों; " भाषेंत गद्यग्रंथांचा प्रचार सुरू होणें हें लोकसुधारणुकेचें एक मोठें चिन्ह आहे.कारण पद्यरचना सोडून देऊन गद्याकडे जेव्हां लोकांचा कल होतो,तेव्हां केवळ मनोरंजन करणाऱ्या विषयांहून अधिक योग्यतेच्या विषयाकडे त्यांचीं मन प्रवृत्त झालीं असें दिसून येतें......ही दुसरी रीत ( गद्यांत शास्त्रीय विषय व्यावहारिक भाषेनें लिहिणें ) हें, राष्ट्राच्या सज्ञान अवस्थेचें विशेष सूचक होय हें उघड आहे. " [ इंग्रजी भाषा. ]

आहे व त्यांतही मेकॉलेच्या निबंधांतून आपल्या मताच्या मंडणार्थ व खंडणार्थ त्यांनीं इतके उतारे घेतले आहेत कीं, मेकॉलेच्या विचारांचें व पद्धतीचें त्यांच्या विचारपद्धतीस किती वळण लागलें आहे, हें या अवतरणबाहुल्यावरूनही सिद्ध होतें. इंग्रजी विचारपद्धतीचें शास्त्रीबोवांनीं इतकें पूर्ण अनुकरण केलें हा सर्वस्वी दोष आहे असेंच आमचें मत आहे, असें मात्र कोणीं समजूं नये; इतकेंच काय, पण शास्त्रीबोवांना इंग्रजीचा इतका दृढ संस्कार झाला नसता, तर निबंधमालेसारखा सुंदर ग्रंथही आपणांस कदाचित् मिळाला नसता. शास्त्रीबोवांचा मुख्य गुण आम्हांस सांगावयाचा आहे तो हा कीं, इंग्रजी ग्रंथांशीं मोठा परिचय करून त्यांतील विचार व लेखनपद्धति हे गुण त्यांनीं इतके आपलेसे करून घेतले होते कीं, मूळ ग्रंथांचा विशेष मागमूस लागूं न देतां स्वतंत्र निबंधरचना त्यांना करतां आली. अलीकडे पुष्कळ इंग्रजी ग्रंथांचीं रुक्ष मराठी भाषांतरें करण्याची प्रवृत्ति कांहीं पदवीधरांनीं पाडिली आहे. त्यापेक्षां शास्त्रीबोवांनीं अवलंबिलेला मार्गच पुष्कळ पटीनें चांगला दिसतो. दाभोळकरांच्या मालेंतले किंवा ग्रंथमाला मासिक पुस्तकांतले कांहीं उत्तम इंग्रजी ग्रंथांचे मराठी तर्जुमे पाहिले म्हणजे भाषांतरकर्त्यांची कींव येते! ज्यांना मूळ इंग्रजी ग्रंथ वाचतां येतात, ते हीं भाषांतरें पाहण्याच्या भानगडींत सहसा पडणार नाहींत व ज्यांना इंग्रजीचा गंध नाहीं ते हीं धेडगुजरी व क्लिष्ट भाषांतरें वाचण्याचे श्रम घेणार नाहींत! एवंच, अशा भाषांतरांचा मोठासा उपयोग कोणासच होत नाहीं. त्यापेक्षां एखाद्या विषयावर इंग्रजींतले अनेक ग्रंथ वाचावे, त्यांचे विचार आपल्या चिंतनानें आपलेसे करावे, आपल्या वाङ्मयांतल्या विचारांशीं त्यांची तुलना करून सापेक्षतेनें दोहींकडल्या ग्रंथांचा अभ्यास करावा, नंतर स्वतंत्रबुद्धीनें त्या विषयांवर आपलें स्वतंत्र मत बनवावें व मग अगदीं स्वतंत्र ग्रंथ इंग्रजी न जाणणाऱ्या लोकांसही कळतील, अशा सरळ, सुबोध भाषेंत, आपले आचारविचार सांभाळून, मोठ्या सावधपणानें व पोक्त विचार करून लिहावे. अशा स्वतंत्र ग्रंथांची मराठींत फार वाण आहे. मालाकारांनींहीं भाषांतरांचा सपाटा चालविला असता, तर निबंधमाला इतकी लोकप्रिय झाली नसती. इंग्रजी उतारे, इंग्रजी वळण, इंग्रजी विचार, इंग्रजी पद्धति, हीं सर्व

इतक्या स्वतंत्रपणानें निबंधमालेनें स्वीकारलेलीं दिसतात कीं, निबंधमाला खरोखरींच परपुष्ट असूनहीं पूर्ण स्वतंत्र ग्रंथ झाला आहे. प्रत्येक ग्रंथकार परपुष्ट असतोच. मागील कवींचीं व ग्रंथकारांचीं वचनें, कोट्या, शब्द-योजना पुढील ग्रंथकार आपलीशीं करून घेतात; पण इतक्या उत्तम तऱ्हेनें त्यांचा आपल्या पद्धतीशीं मिलाफ करितात कीं, त्यामुळें त्यांचा स्वतंत्रपणा मोडत नाहीं. शेक्स्पीअरनें पूर्वींच्या कित्येक ग्रंथकारांचीं संविधानकें, कल्पना, विचार, वाक्यरचना व नांवें सुद्धां उचलून स्वतंत्र नाटकें रचलीं आहेत, मिल्टनचे कित्येक सुंदर शब्द व प्रयोग ग्रे कवीनें आपल्या काव्यांत योजले आहेत, ज्ञानेश्वरींतल्या कित्येक कल्पना व ओव्या एकनाथानें व तुकारामानें आपल्याशा करून घेतल्या आहेत, एकनाथाच्या ओव्या तुकारामानें व या दोघांच्याही मोरोपंतानें घेतल्या आहेत. उत्तम ग्रंथकार म्हणजे अट्टल प्रतीचा चोर असतो ! ज्याचें चौर्यकर्मांत जितकें कसब अधिक तितका तो चतुर अधिक ! ! जाणूनबुजून चौर्यकर्म करणारे अपराधी ठरतातच; पण उत्तम ग्रंथकार असे लबाड नसतात. त्यांची पूर्वकवींच्या विचारादिकांशीं इतकी एकरूपता झालेली असते कीं, आपल्या हातून चौर्यकर्म घडत असतें याचेंही त्यांस भान नसतें. इंग्रजी शिक्षण व इंग्रजी वाङ्मयाच्या सुंदर पद्धति शास्त्रीबोवांत इतक्या उत्तम प्रकारें मुरल्या व त्यांचें त्यांनीं इतक्या उत्तम प्रकारें चीज करून दाखविलें कीं, मराठी भाषेचा पुरस्कर्ता म्हणून त्यांच्या शेजारीं बसावायला दुसरा पद-वीधर अजून झाला नाहीं. मराठी गद्यग्रंथांत निबंधमालेला अग्रपूजेचा मान सर्वकाळ मिळेल. इंग्रजी विद्यावृक्षाला महाराष्ट्रांत जें पहिलें सरस फळ आलें तें ' निबंधमाला ' होय.

१३. मालेंतल्या निबंधांचे भाषाविषयात्मक, वाङ्मयात्मक, सामाजिक वगैरे जे प्रकार सांगितले त्या सर्व प्रकारांचा निबंधवार विचार करावयाला येथें सवड नाहीं, तरी ठोकळ मानानें या निबंधांचें स्वरूप काय आहे तें आतां संक्षेपानें सांगण्याचा उपक्रम करतों. इंग्रजी भाषा यावर जो निबंध लिहिला आहे तो इंग्रजी भाषेचा उत्कर्ष कसा होत गेला, तींत ग्रंथसंपत्ति कोणत्या प्रकारची आहे, यांचें आपल्या लोकांस ज्ञान होऊन तदनुसार ' देशभाषा सुधारण्याच्या सांप्रतच्या प्रयत्नांस ' अधिक जोर

यावा म्हणून लिहिला आहे. पण सर्व निबंध नीट पाहिला म्हणजे असें दिसतें कीं, इंग्रजी भाषेची उत्पत्ति, वाढ व अभिवृद्धि कशी झाली, या मुख्य मुद्याचें विवेचन त्यांत फारच त्रोटक केलें आहे व ग्रंथांसंबंधीं माहिती दिली आहे तीही अगदींच अपुरी आहे. या निबंधावर चार लेख लिहिले आहेत; त्यांपैकीं तीन लेख केवळ ' इतिहास ' या विषयाला दिले आहेत व एका म्हणजे पहिल्या लेखांत, इंग्रजी भाषेची उत्पत्ति, तिचे घटकावयव, गद्यात्मक ग्रंथांची प्रवृत्ति व कविता, गद्याचे प्रकार, निबंध व मेकाले इतके महत्वाचे विषय कोंबले आहेत. इतिहासावर स्वतंत्र लेख पूर्वींच लिहिला होता. म्हणून ' इंग्रजी भाषा ' याप्रमाणें व्यापक नांवाचा ज्याला मथळा दिला, त्यांत एकाच अंगाचें आणि ज्याचा पूर्वीं स्वतंत्र विचार झाला आहे अशा अंगाचें विवेचन करण्याकरितां निबंधाचा बहुतेक भाग दिल्यामुळें या निबंधापासून नांवाप्रमाणें बोध होत नाहीं. हरिदास जसा मूळपदावर वारंवार येतो त्याप्रमाणें प्रसंग निघाला कीं, शास्त्रीबोवांची लेखणी इतिहासाकडे ज्यास्त वाहात असे; यामुळें एकंदरीनें मुख्य निबंधास थोडेसें गौणत्व आलें आहे. या निबंधांत मुख्य दोष हा आहे कीं प्रधान अंगांचा जसा व्यापकपणें विचार व्हावयाला पाहिजे होता तसा तो न होतां, एकाच अंगावर सर्व निबंध टेंकला आहे व मोठाल्या ग्रंथकारांचा नामोच्चारही न होतां बारीकसारीक अशा पांच चार ग्रंथकारांवरच निबंधकारानें आपली लेखणी चालविली आहे. तरी अशा प्रकारचा निबंध पूर्वीं मराठींत कोणीही लिहिला नसल्यामुळें ही एक नवी दिशा मालाकारांनीं दाखवून दिली याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. इंग्रजी भाषेची उत्पत्ति व वाढ कशी झाली, तींत गद्यपद्यात्मक ग्रंथकर्ते कोणत्या वेळीं झाले, त्यांपैकीं प्रत्येकाचा भाषाभिवृद्धीस काय उपयोग झाला, यावर इंग्रजींत ' इंग्रजी वाङ्मयाचे इतिहास ' पुष्कळ आहेत, ते सर्व मूळग्रंथासुद्धां वाचून कोणी स्वतंत्रपणें ' इंग्रजी भाषेवर' विस्तृत व व्यापक निबंध लिहील तर अशा पुस्तकाचा मराठी भाषावृद्धीस फार उपयोग होणार आहे. इतर भाषाविषयक निबंध जे आहेत ते मराठी भाषेची आजकाल उपेक्षा होते ती होऊं नये व तिच्या अभिवृद्धीकडे सर्वांचें लक्ष लागावें यास्तव लिहिले आहेत. " ज्यांनीं तिच्या अभिवृद्ध्यर्थ उत्साहानें

झटावें, त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यताबुद्धि, पंडितमन्यता, वगैरे दोष अखंड वसल्यामुळें तिची मोठी हानि होऊन ती क्षयाच्याच पंथास दिवसेंदिवस लागत आहे...इंग्रजीसारख्या प्रबल परभाषेचा तिजवर अगदीं पगडा बसून तिचें स्वत्व म्हणजे निराळेपण नष्ट होण्याच्या बेतांत आहे. तेव्हां अजून जोंवर हें संकट अनिवार्य झालें नाहीं तोंवरच तिच्या कैवाऱ्यांस कंबर बांधण्याचा अवकाश आहे!" मराठी भाषेवर प्रस्तुत मोठें संकट ओढवलें आहे व तिच्या रक्षणार्थ आपण कंबर बांधली पाहिजे, असें शास्त्रीबोवांच्या मनानें घेतल्यामुळेंच त्यांनीं निबंधमाला गुंफण्यास सुरवात केली व मराठीची सांप्रतची शोचनीय स्थिति वर्णून इंग्रजी भाषेचें वैभव मराठी वाचकांपुढें मांडलें; तें अशाकरितां कीं, त्यांना कांहीं तत्सदृश कार्य करण्याची प्रेरणा व्हावी. हा काळ इंग्रजी व मराठी यांच्या संयोगाचा असल्यामुळें इंग्रजी ग्रंथांचीं कांहीं मराठी भाषांतरें होणारच हें जाणून त्यांनीं 'भाषांतरा' वर एक सुंदर निबंध लिहिला आहे. मराठींत उत्कृष्ट भाषांतरें आजवर फारशीं झालीं नाहींत. पूर्वकवींपैकीं वामन-पंडितांसारखें भाषांतर कोणालाच करितां आलें नाहीं. वामनपण्डितांनीं भर्तृहरीचीं तीन शतकें, गंगालहरी, गीतासमश्लोकी वगैरे मराठी भाषांतरें इतकीं उत्कृष्ट केलीं आहेत कीं, मूळ व वामनी श्लोक यांपैकीं अधिक सरस कोणतें याचा निश्चय पंडितांसही करितां येणार नाहीं! भाषांतर करावें वामनानेंच. अर्वाचीन पंडितांपकीं गद्यपद्यांत सुरस भाषांतर उठविण्याचीं कला कृष्णशास्त्र्यांसारखी कोणासही साधलेली नाहीं. इंग्रजी ग्रंथांच्या आधारें पण स्वतंत्र बुद्धीनें रचलेले स्वतन्त्र मराठी ग्रन्थ पाहिजेत म्हणून वर सांगितलें आहे, पण कांहीं ग्रंथांचीं भाषान्तरेंही हवीं आहेत; मात्र तीं इतकीं सहजसुलभ उतरलीं पाहिजेत कीं, इंग्रजीचा संपर्क नसलेल्या स्त्रिया व जुने वृद्ध लोक यांनाही आयासावांचून तीं कळावींत. असें होत नसेल तर स्वतंत्रपणें त्या ग्रंथांचा मतलब आपल्या भाषेत सांगावा. भाषांतर करण्यासंबंधीं शास्त्रीबोवांनीं मुख्य २।४ नियम सांगितले आहेत, ते महत्त्वाचे आहेत. ते म्हणतात:—" उत्कृष्ट भाषांतरकार म्हटला ह्मणजे त्यास इतके गुण अवश्य पाहिजेत. एक तर ज्या भाषेंतून तो भाषांतर करणार ती त्यास पूर्ण अवगत व्हावी; म्हणजे व्याकरणरचना, अर्थस्वा-

रस्य, वगैरे त्याचें त्यास यथास्थित कळलें पाहिजे. दुसरे ज्या भाषेंत भाषांतर उतरावयाचें तिचेंही पहिल्यासारखेंच त्यास पूर्ण ज्ञान पाहिजे. हें काम पहिल्यापेक्षां किती कठीण आहे, हें सांगावयास नकोच. भाषा-भाषांत अनेक प्रकारची तफावत असते. कित्येकांत शब्दसंग्रह थोडा, कित्येकांत पुष्कळ; कित्येकांत संस्कृताप्रमाणें शब्दसाधनिकेची पुष्कळ सोय असते म्हणजे एका शब्दावरून निरनिराळया अर्थाचे वाचक असे शब्द तावडतोब हवे तितके करितां येतात, कित्येकांत ही सोय थोडी असते; कित्येकांत अशा कांहीं कल्पना असतात कीं, त्या दुसऱ्या भाषेनें व्यक्त करितांच येत नाहींत. याखेरीज शब्दांचें मृदुत्व, सौन्दर्य, लालित्य इत्यादि प्रकार, वाक्यरचनेची रीत, भाषापद्धतीची शैली, वगैरेही आण-खी अनेक भेद असतात. तऱ्हां या सर्व अडचणींतून बरेपणीं निभा-वून जाणें लहानसान काम नव्हे. त्यास मनुष्याच्या आंगीं समंजसता व चातुर्य असून भाषांतराच्या कामांत तो चांगला घटलेलाही असला पाहिजे. तिसरी गोष्ट ज्याचें भाषांतर करावयाचें तें होण्यासारखें पाहिजे. चवथी गोष्ट, भाषांतरकर्ता मूळ ग्रंथकाराशीं समवृत्ति असला पाहिजे. म्हणजे मूळग्रंथकाराची वृत्ति जशी रंगेल, थट्टेखोर किंवा गंभीर, कडक वगैरे असेल तशीच भाषांतर करणाराची असावयास पाहिजे. किंबहुना एकाच ग्रंथांत अशा वृत्ति जसजशा त्यानें जागोजाग प्रकट केल्या अस-तील तसतशा अनुक्रमानें भाषांतरांत उतरल्या पाहिजेत." हा सुंदर उतारा भाषान्तरकर्त्यांनीं नेहमीं हृदयसंपुटीं ठेवावा. भाषादूषण; लेखन-शुद्धि व भाषापद्धति हे तीन निबंध मराठी भाषा इंग्रजीभाषासंसर्गानें दूषित न होतां अभियुक्त भाषापद्धतीचें तिला वळण लागावें, या हेतूनें लिहिलेले आहेत. "धड इंग्रजी नव्हेत, धड मराठी नव्हेत—ज्यांचा अर्थ इंग्रजी आणि उच्चार मराठी, असे अर्धे कच्चे शब्द मराठींत येऊं देऊं नयेत" व इंग्रजीची भेसळ होऊन मराठी भाषा बिघडूं देऊं नये म्हणून 'भाषादूषण' हा निबंध लिहिला आहे. (१) चांगले शुद्ध मराठी शब्द पण त्यांस इंग्रजीचें स्वरूप दिलेलें [ जसें: 'मी आपले विचार सभेपुढें मांडतो अगर ठेवतो;' 'हा निराळा प्रश्न आहे.' ] (२)चांगले संस्कृत शब्द पण त्यांचा मूळचा अर्थ सोडून देऊन भलत्याच रीतीनें

त्यांचा प्रयोग केलेला [जसें: 'स्वकपोलकल्पित ग्रंथ'; 'तूं त्याजवर कां अवलंबून राहतोस'? ]; (३) नवेच बनविलेले संस्कृत शब्द [जसें: साल्हादाश्चार्य;' 'महत्त्वाकांक्षा.'; हे तीन भाषादूषणाचे मुख्य प्रकार म्हणून शास्त्रीबोवांनीं दिलेले आहेत. आज पंचवीस वर्षांत हे तीनही प्रकार—दूषणीय म्हणून ठरविलेले—मराठींत अगदीं पक्के मुरून गेले आहेत. मुसलमानी अमलांत अरबी, फारशी भाषांतले शब्द जसे साफ मराठींत घुसले तशा इंग्रजी गद्याच्या अनेक तऱ्हा व वाक्यरचनेचे अनेक प्रकार मराठींत घुसणारच, व घुसले आहेत. जेथें शुद्ध मराठी शब्द किंवा वाक्यरचना योजणें शक्य आहे तेथें इंग्रजी शब्द किंवा वाक्यरचना योजणें हें मात्र खरोखर भाषादूषण आहे. कोर्ट, स्टेशन, मास्तर, असले इंग्रजी शब्द मराठींत जे घुसले आहेत ते आतां निघणार नाहींत. शास्त्रीय ग्रंथ लिहिण्याच्या वेळीं नवे नवे मराठी शब्द तयार करावे लागतात, तेव्हां संस्कृत भाषेच्या साह्यानें ते तयार करावे व जेथें इंग्रजी शब्दाला बरोबर मराठी शब्द तयार करूनही देतां येणार नाहींत, तेथें इंग्रजी शब्द वापरावा. शास्त्रीबोवा म्हणतात:—" इंग्रजींतल्यासारखे शास्त्रीय ग्रंथ, व्याख्यानें, निबंध वगैरे लिहितांना ग्रंथाची एकंदर रचना इंग्रजी ग्रंथाच्याच धाटणीवर केली पाहिजे. म्हणजे मजकूर कलमवार लिहून विरामचिन्हेंही जशीं इंग्रजीच्या नमुन्यावर मराठींत मांडतात, त्याप्रमाणेंच लिहिण्याचा एकंदर झोंकही बहुधा इंग्रजीसारखाच आणल्याशिवाय गत्यंतर नाहीं......कांहीं बेताचे इंग्रजी शब्द मराठींत घेतले असतां व तींतील ग्रंथरचनाही तींत उतरली असतां तीस अपाय न होतां तिचें हितच होईल. मात्र यास मूळच्या भाषेहून शिरजोर होऊं देतां कामा नये." हें शास्त्रीबोवांचें म्हणणें वाजवी आहे व बहुधा याच धोरणावर अलीकडे ग्रंथरचना होत असते. लेखनशुद्धींत वर्णशुद्धि, शब्दशुद्धि व वाक्यशुद्धि या तीनही प्रकारांचा थोडा विचार केला आहे. हा निबंध आणि पुढचा भाषापद्धतीवरचा मार्मिक निबंध हे ग्रंथकार होऊं पाहणारानें अगत्य लक्षपूर्वक वाचावेत. उत्तम भाषापद्धतीचे शास्त्रीबोवांनीं चार गुण सांगितले आहेत. (१) 'शुद्धता' शुद्धता म्हणजे अगोदर वर्ण, शब्द व वाक्य या तीन प्रकारांनीं वाक्य निर्दोष असणें हें होय. (२) 'साधेपणा.' हा गुण कृत्रि-

मतेच्या उलट आहे. यास संस्कृत साहित्यग्रंथांत ‘ प्रसाद ’ असें पारिभाषिक नांव आहे. या लहानशा सुंदर शब्दावरून आमच्या पूर्वजांचें चातुर्य पूर्ण दिसून येतें. यांत विवक्षित अर्थाचें व्यंजकत्व किती उत्कृष्ट तऱ्हेचें आहे व त्यावर कवित्वाची झांक तरी किती बहारीची आहे ! ‘ प्रसाद ’ या शब्दाचा मूळ अर्थ ‘ स्वच्छपणा, ’ ‘ निवळपणा ’ असा आहे व तो शरत्कालच्या वगैरे उदकास लावतात. तेथून हा शब्द घेऊन साहित्यशास्त्रकारांनीं कवीच्या सरस्वतीस लाविला आहे. असो; तर “ज्याप्रमाणें पर्वतांवरील झऱ्यांचें किंवा कित्येक नद्यांचें पाणी निवळशंख असून पुनः खोलही असतें, त्याचप्रमाणें अवघ्या जगास आल्हादप्रद झालेल्या ज्या होमर, कालिदासप्रभृति कवीश्वरांच्या कृति त्यांतही प्रसन्नार्थत्व व गांभीर्य हे गुण साहचर्यानें सांपडतात...सारांश, ज्याप्रमाणें स्वच्छ हंडींत किंवा लखलखीत कंदिलांत दिवा लावला असला म्हणजे त्याचा प्रकाश बाहेर उजळ पडून त्यास अधिक शोभाही येते,त्याचप्रमाणें आंतील अर्थ सुंदर असून ग्रंथाची शब्दरचनाही जर प्रसादगुणेंकरून युक्त असेल तर तो अर्थ एरव्हींपेक्षां अधिक खुलेल, हें उघडच आहे !” ( ३ ) ‘ सुबोधत्व. ’ म्हणजे शब्द अगदीं प्रचारांतले असून वाक्यांत दूरान्वय नसावा. ( ४ ) ‘ अवतरण ’ अवतरण म्हणजे अभियुक्त ग्रंथकारांच्या ग्रंथांतून आपल्या मतास पुष्टि आणण्याकरितां किंवा लेखास शोभा आणण्याकरितां घेतलेलें वचन. रसिक ग्रंथकार फार अवतरणें घेऊन आपल्या ग्रंथाची सुबोधता घालवीत नाहींत. हे मुख्य चार गुण उत्तम भाषापद्धतीचे आहेत, असें सांगून शास्त्रीबोवांनीं बाळमित्र, अनेकविद्यामूलत्व, रासेलस, इसापनीति, केकावलीची दादोबा पांडुरंगांची प्रस्तावना या ग्रंथांतून अनेक मार्मिक उदाहरणें देऊन हा सुरस निबंध संपविला आहे.

१४. याप्रमाणें भाषाविषयक निबंधांचें ठोकळमानानें स्वरूप सांगितलें आहे. हे सर्व निबंध अगदीं स्वतंत्र असून मोठ्या कल्पक बुद्धीनें व मार्मिकपणानें लिहिलेले आहेत. भाषाविषयाचा अभ्यास ज्या दृष्टीनें युरोपांतील पंडित करितात ती दृष्टि या निबंधांत मालाकारांनीं आपल्या देशबांधवांस आणून दिली आहे.

१५. वाङमयात्मक लेख एकंदरीनें सर्वोत्कृष्ट आहेत. वाचन,

वक्तृत्व, इतिहास व विद्वत्त्व आणि कवित्व हे लेख माहितीनें भरलेले, बहुश्रुतपणामुळें मनोरंजक झालेले व बहुधा निर्विवाद असेच आहेत. विद्वत्त्व आणि कवित्व हा लेख सरस आहे; त्यांत कवित्वासंबंधीं बऱ्याच जुन्या कल्पना खोडून कवितेचें लक्षण दिलें आहे. " तेव्हां एकंदर सांगावयाचें काय कीं, सत्काव्यास पद्यरचना, यमक, प्रास, श्लेष, किंबहुना वर्णमाधुर्य, यांपैकीं कोणाचीही बिलकुल गरज नाहीं ! जें वाचल्यानें किंवा ऐकल्यानें मनाच्या वृत्ति प्रसन्न होऊन तो तो रस अंतःकरणांत सहज बिंबून जातो त्यास काव्य म्हणावें. " पण या निबंधांतला शास्त्रीबोवांचा मुख्य मुद्दा हा आहे. " कवित्वास विद्वत्तेची अगदीं गरज नाहीं. निरनिराळ्या शास्त्रांत पुरतेपणीं गति होणें हें कवित्वास अनुकूल होणार नाहीं; हें तर काय, पण अगदीं साक्षात् प्रतिकूलच बहुधा होणार आहे. " हा मुद्दा निर्विवाद दिसत नाहीं. जगांतले महाकवि बहुधा महापंडित होते. शेक्सपीअर व तुकाराम यांस शास्त्रीबोवा अविद्वान् कवींत गणतात, तें कशावरून हें समजत नाहीं. शेक्सपीअरला व्यवहारांतल्या अनेक कलांचें फार मार्मिक ज्ञान होतें. त्याच्या पूर्वीं होऊन गेलेल्या युरोपांतल्या अनेक नाट्यकारांचे व विविध ग्रंथकारांचे विविध ग्रंथ त्यानें वाचले होते. युरोपांतल्या अनेक देशांच्या इतिहासांचें त्यास फार सूक्ष्म ज्ञान होतें व राजकारणी पुरुषांचीं चरित्रें, राज्यक्रांत्यांचे इतिहास, अनेक शास्त्रांचीं सूक्ष्म तत्त्वें त्यास अवगत होतीं, हें शेक्सपीअरच्या नाटकग्रंथांवरून अगदीं स्पष्ट होत आहे. तेव्हां मिल्टनला विद्वान् कवींत घालून शेक्सपीअरला अविद्वान् कवींत घालणें योग्य दिसत नाहीं. तसेंच, तुकारामाला अविद्वान् कसें म्हणतां येईल ? स्वतः तुकोबा आपलें ज्ञान झांकून ठेवीत नाहींत. त्यांनीं ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, कबीर नामदेवादि भारतीय संतांच्या उक्ति, रामायणभारतभागवतादि महाग्रंथ, अनेक पुराणें हीं वाचलीं होतीं, ऐकिलीं होतीं, त्यांवर शतशः निरूपण केलें होतें व ऐकलें होतें. अशा कवीला अविद्वान् कसें म्हणावें ? स्वतः तुकोबांच्या अभंगांत त्यांच्या विस्तृत वाचनाबद्दल पुष्कळ उल्लेख सांपडतात. ' कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनीयां '

असें ते स्वतः सांगतात. मीं पुराणांचा अर्थ समजून घेतला आहे, भरमसाट कवित्व केलें नाहीं, असें तेः—

पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ १ ॥

नव्हती हे आहाच बोल । मोकळे फोल कवित्व ॥ २ ॥

स्वतः म्हणतात. इतिहासपुराणांचीं वचनें तुकोबांच्या अभंगांत सांपडतात. तेव्हां एकंदरीनें तुकारामास अविद्वान् म्हणणें अगदीं चुकीचें आहे. तुकाराम अशिक्षित होता असें मालाकारांप्रमाणें पुष्कळ पंडितांचें मत आहे, पण तें वस्तुस्थितीस सोडून आहे.[1] शास्त्रीबोवांनीं मोरोपंतांच्या शिक्षणाविषयीं व विद्वत्तेविषयीं असेच मोठे प्रमाद केले आहेत, पण त्यांचा विचार मी दुसरे ठिकाणीं करीत असल्यामुळें येथें त्याबद्दल कांहींच सांगत नाहीं.[2]

१६ तात्पर्य, शेक्स्पीअर, तुकाराम, मोरोपंत हे अविद्वान् व अपंडित होते, असें समजणें म्हणजे मोठाच प्रमाद करणें आहे. कदाचित् शास्त्रीबोवांचे अंध पक्षपाती असें म्हणतील, कीं, या कवींनीं पुष्कळसे काव्येतिहास पुराणादि ग्रंथ वाचले असतील, पण न्याय, व्याकरण, मीमांसा इत्यादि शास्त्रांचे या कवींनीं अध्ययन केलें होतें असें जोंपर्यंत ठरत नाहीं, तोंपर्यंत त्यांची विद्वानांत गणना करितां येणार नाहीं. पण अशी विद्वत्तेची मर्यादा संकुचित केली म्हणजे पुष्कळ विद्वनांस विद्वानांच्या सभेंतून हाकून द्यावें लागेल ! खुद्द मालाकारांवरही असा धक्काबुक्कीचा प्रसंग येऊन त्यांचें ‘ विद्वत्व व कवित्त्व ’ या विषयींचें लिहिणें म्हणजे एका अविद्वानाचा प्रलाप ठरेल ! तर विद्वतेची इतकी संकुचित मर्यादा करण्याचें कारण नाहीं. शेक्स्पीअर, तुकाराम, मोरोपंत यांना अविद्वानांत घातल्यावर विद्वान् पुरुष औषधालाही मिळणार नाहीं ! तस्मात् हे अविद्वान् नव्हते हेंच खरें. अर्थात् शास्त्रीबोवांचा जो मूळ सिद्धांत कीं ‘ कवित्वास विद्वत्त्वाची गरज नाहीं व ते उलट प्रतिकूळ आहे, ’ हा खोटा ठरतो. आम-

---

१ शके १८४२ मध्यें प्रसिद्ध केलेल्या ‘ श्रीतुकारामचरित्र ’ ह्या माझ्या ग्रंथांतील ‘ तुकोबांचें ग्रंथाध्ययन हें प्रकरण पहा ( पृ० १५८—२१९ ). २ माझा ‘ मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन’ हा ग्रंथ पहा. ‘ प्रकरण तिसरें ’ ( पृ० २४-५० ) यांत पंतांचें शिक्षण व विद्याव्यासंग ’ कसा होता हें सांगतांना शास्त्रीबोवांच्या वरील मतांचें खण्डण केलें आहे.

ऱ्याकडील साहित्यशास्त्रज्ञांनीं विद्वत्व हें कवित्वगुणास अत्यंत आवश्यक ठरविलें आहे. मम्मटानें काव्यहेतूंमध्यें 'लोकशास्त्रकाव्याद्यवेक्षणात् निपुणता' व 'काव्यज्ञशिक्षयाभ्यास' यांस घातलें आहे; म्हणजे त्याच्या मतें 'स्थावरजंगमात्मक लोकवृत्त, छंदोव्याकरणादि शास्त्रग्रंथ, महाकवींचे ग्रंथ,' यांचें ज्ञान महाकवीला अवश्य आहे. दंडी वगैरेंनीं असेंच ठरविलें आहे. भवभूति मालतीमाधवाच्या उपोद्घातांत आपलें 'वेदाध्ययन व सांख्ययोगादिकांचें ज्ञान' प्रकट करितो. जगांतले महाकवि बहुधा मोठे विद्वान् होते. अध्ययन, अवलोकन व व्यवहार या तीनही प्रकारांत निष्णात नव्हता असा कवीश्वर सांपडणें कठीण आहे. विद्वत्त्व हे कवित्वास अनुकूल नसून उलट प्रतिकूल आहे, असें शास्त्रीबोवाच्या मनानें घेतल्यामुळें चांगले कवि विद्वान् नव्हते, असा त्यांनीं आपला ग्रह करून घेतला व तो अनेक ठिकाणीं प्रतिपादिला:—"सर्वांपेक्षां अधिक सदोष कविता पाहणें असल्यास आमची मराठी होय. तींतील बहुतेक कवींस व्याकरणाची, छंदांचीं वगैरे ओळखसुद्धां नव्हती असें म्हणण्यास हरकत नाहीं; मग पदलालित्य, अर्थगांभीर्य वगैरे काव्यगुणांची तर गोष्टच नको! प्रसाद हा गुणही त्यांच्या कवितेंत सर्वत्र आढळतोच असा नेम नाहीं!" हा अभिप्राय किती चुकीचा आहे हें आज करीत सिद्ध बसण्याचें कारणच नाहीं. गेल्या तीनशें वर्षांत आनंदतनय, रघुनाथ व वामनपंडित, मुक्तेश्वर, विठ्ठल, मोरोपंत, रामजोशी वगैरे अनेक कवींनीं संस्कृतांतल्या बहुतेक छंदांत शेंकडों श्लोक वगैरे केले व इतर दिंडी, कडाका, लावणी वगैरे शुद्ध मराठी वृत्तें अस्तित्वांत आणलीं, त्यांस 'छंदांची ओळख सुद्धां नव्हती' काय ? विठ्ठलकवीनें चित्रकाव्याचीं बहुतेक उदाहरणें आपल्या काव्यांत दिलीं आहेत. निरंजनमाधवानें छंदःशास्त्रावर तीन स्वतंत्र ग्रंथ केले आहेत. मोरोपंतांनीं कुशलवचरित्र व अनेक रामायणें, यांत कित्येक छंदांची योजना करून शिवाय छंदोरामायण म्हणून शेंपन्नास छंदांत एक निराळेंच रामायण रचिलें आहे. तेव्हां 'मराठी कवींना छंदांची ओळख नव्हती' हा अभिप्राय अगदीं ठार चुकला आहे. तसेंच वामन, आनंदतनय, अमृतराय, मोरोपंत, रामजोशी यांचीं काव्यें पाहणारा मनुष्य पदलालित्य मराठी कवितेंत नाहीं, असें चुकून सुद्धां म्हणणार नाहीं. अर्थ-

गांभीर्याला मुक्तेश्वर व मोरोपंत हे जगांतल्या कोणत्याही कवीस हार जाणार नाहींत. हे एवढे कवि डोळ्यांसमोर असतांना विष्णुशास्त्र्यांसारख्या रसिक मनुष्यानें अशीं बेधडक विधानें करावींत हा केवढा प्रमाद ! पुढें तर त्यांनीं कमालच केली आहे ! कवित्वाचा सर्वस्व जो प्रसाद तोही मराठींत यथातथाच आहे म्हणून शास्त्रीबोवा गुळमुळीत लिहितात ! ज्ञानेश्वरी, तुकारामाचे अभंग व शेंकडों कवींची प्रासंगिक कविता यांत काय प्रसाद नाहीं ? मराठी कवितेचे एवढे अभिमानी पंडित असे कसे वसरले म्हणून कोणी विचारील, तर त्यास तीन उत्तरें आहेत. पहिलें उत्तर असें कीं, वरच्या उताऱ्याचा संदर्भ कवित्वाची व विद्वत्वाची असंगति दाखविण्याचा आहे, तेव्हां उत्तम मराठी कवि अविद्वान्, त्यांना छंद काय, व्याकरण काय यांची माहिती नव्हती, मग त्यांच्या कवितेंत पदलालित्य, अर्थगांभीर्य व प्रसाद कोठला असणार असें शास्त्रीबोवा लिहिण्याच्या भरांत लिहून गेले ! त्यांना तेव्हां सत्यासत्यतेचा विचार राहिला नाहीं. दुसरें कारण असें कीं, शास्त्रीबोवांचें खरें मत मराठीला प्रतिकूळ नाहीं. मराठी कवितेचा पुरस्कार त्यांनीं पुष्कळ ठिकाणीं केला आहे. निबंधमालेच्या दुसऱ्याच पानावर ‘ जीस मुक्तेश्वर, वामनपंडित, मोरोपंत इत्यादि कवींनीं आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीनें संस्कृत भाषेचीच प्रौढी आणली, त्या भाषेस आवेश, गांभीर्य, सरसता, या गुणांकरितां कोणत्याही अन्य भाषेच्या तोंडाकडे पाहण्याची गरज नाहीं, अशी आमची खात्री आहे ’ असें मराठी कवितेचें गौरव केलेलें आढळतें ! येथें लिहिण्याच्या भरांत मालाकार आपलें खरें मत विसरले ! तिसरें, मालाकारांच्या वेळीं मराठी कवितेचा बराच भाग उपलब्ध झाला नव्हता व जो झाला होता त्याचाही बराच भाग मालाकारांनीं वाचला नव्हता व जो वाचला होता तोही चांगलासा मुरला नव्हता ! कवितेचें वाचन मुरावयाला जो अवधि लागतो, त्याचा रस मनांत बिंबून अखंड चिंतनानें त्याचें मर्म कळावयाला जो एकांत व जी शांति लागते, मराठी कवितेचें माधुर्य कळावयाला जो क्षेत्रवास, संतसंग व भक्तिमान् हृदय लागतें तो अवधि, तो एकांत व ती भक्ति शास्त्रीबोवांचे वांट्याला आली नव्हती. शास्त्रीबोवा रसिक व मर्मज्ञ होते; पण भक्तिमान् होते

असें दिसत नाहीं, जर असते तर मराठी कवितेबद्दल त्यांचे लेख निराळ्या तऱ्हेचे आले असते व त्यामुळें निबंधमालेच्या स्वरूपांतही निराळेंच दिव्य तेज दिसलें असतें. निबंधमालेंत तेज आहे; पण तें ईश्वरी प्रसादाचें, भक्तीचें, व सदनुग्रहाचें नसून देशाभिमानाचें, रसिकतेचें व कर्तृत्वाचें आहे.

१७ ' मोरोपंतांची कविता ' हा निबंधमालेंतला लेख इतर सर्व लेखांहून अधिक गाजला. मराठी शाळामास्तरांपासून तों वामनरावजी ओकांपर्यंत व माधवरावजी रानड्यांपर्यंत या लेखानें सर्वांच्या मनोवृत्ति जागृत केल्या. बहुजनसमाजाचें लक्ष निबंधमालेकडे वेधलें, मालेचे वर्गणीदार वाढले, लहानथोरांत तिच्या लेखांबद्दल चर्चा होऊं लागली, तें सर्व या लेखामुळें. या लेखांत शास्त्रीबोवांनीं जीं काहीं प्रमादयुक्त व संशयात्मक विधानें केलीं आहेत, त्यांचा विचार अन्य ठिकाणीं होणार असल्यामुळें येथें त्यांविषयीं मौनच धरणें योग्य दिसतें.तथापि ह्या निबंधानें मोरोपंताच्या कवितेवर येणारे आक्षेप बरेचसे उडून गेले. डॉ. विल्सन, माधवरावजी रानडे, विविधज्ञानविस्तारकर्ते अशासारख्या जाड्या पंडितांनीं बिचाऱ्या मोरोपंतांच्या कवितेला जीं निरर्थक दूषणें लाविलीं होतीं, तीं उडून जाऊन मोरोपंतांच्या कवितेविषयींचा आदर ज्यास्त वाढला व इंग्रजी शिकलेल्या लोकांत मराठी कविता वाचण्याचा व जुनीं दप्तरें हुडकून काढण्याचा प्रघात अधिक पडत चालला. ' जॉन्सनचें चरित्र ' हा निबंध मात्र सर्वोत्कृष्ट उतरला आहे. चरित्र लिहिण्याची ही अर्वाचीन तऱ्हा आमच्या लोकांस याच निबंधानें प्रथम दाखवून दिली. जॉन्सनच्या वेळीं इंग्लंडांत जशी परिस्थिति होती, तशीच आमच्याकडे प्रस्तुतकाळीं आहे. तेव्हां अशा स्थितींत मराठी भाषेचा भाग्योत्कर्ष करूं पाहणाऱ्या होतकरू तरुणांस कित्ता घेण्यास योग्य अशा या थोर पुरुषाचें चरित्र शास्त्रीबोवांनीं निवडून काढलें हें योग्य केलें. ' जॉन्सनचे गुणदोष ' व ' त्याच्या चरित्रापासून आमच्या लोकांनीं घेण्यासारखा बोध ' हे भाग प्रत्येक तरुणानें अवश्य वाचावे. याप्रमाणें वाङ्मयात्मक निबंधांचें थोडक्यांत विवरण केलें आहे.

१८ ' संपत्तीचा उपभोग, ' लोकभ्रम ' व 'आमच्या देशाची स्थिति'

हे तीन निबंध सामाजिक विषयांची चर्चा करणारे आहेत. या तीनही निबंधांत मुख्य धोरण एकच आहे. तें हें कीं, आमच्यांतल्या श्रीमंत लोकांनीं, राजेरजवाड्यांनीं व मध्यम स्थितींतल्या समजूतदार लोकांनीं भूतपिशाचादि व शकुनादि निरर्थक व क्षुद्र विषयांत आपली अक्कल व पैसा खर्च न करितां तो युरोपिअन लोकांप्रमाणें देशोन्नतीच्या कामाकडे खर्च करावा. पहिल्या निबंधांत शास्त्रीबोवा ह्मणतातः—"आमच्या लोकांनीं तक्केलोडांशीं बसण्यांत व इकडची काडी तिकडे न करण्यांत प्रतिष्ठा न मानतां त्यांसारखे यांनीं व्यायाम करावे, देशाटनें करावीं, तसेंच अक्षरशून्य व नेहमीं रिकामें राहण्यांत भूषण न मानतां त्यांसारखें विद्यानिपुण होऊन जगांत नांव राखण्याची उमेद धरावी." तिसऱ्या निबंधांत शास्त्रीबोवा म्हणतातः—"आमच्या लोकांनीं जन्मास येऊन करावें काय ? तर परदास्य करावें; यजमानाची खुषामत करावी; लांड्यालबाड्या कराव्या; लोकांच्या मुंड्या मुरगाळाव्या; वरिष्ठाची थुंकी झेलून हाताखालच्यांस गांजावें व शेवटीं पैशाची गांठोडी उराशीं घट्ट आवळून धरून एकादे दिवशीं मरून जावें ......" आतां हुषार व शाहणा मनुष्य कोण ? तर "जो साहेबाचे बूट उचलील, वरिष्ठानें कितीही पुष्पवृष्टि केली तरी ती जो प्रेमानें झेलील, आंगमस्तीपर्यंत येऊन ठेपली तरी ख्रिस्तप्रभूच्या उपदेशाप्रमाणें जो दुसरा गाल खुशाल पुढें करील, आपल्या यत्किंचित् स्वार्थासाठीं किंवा नुस्ती बहादुरी मिळविण्यासाठीं जो देशाशीं मात्रागमनीपणा करतांना बिलकूल शरम बाळगणार नाहीं तो !" याप्रमाणें श्रीमंत लोक व सामान्य स्थितींतले शिकलेसवरलेले जाणते लोक यांची स्थिति शास्त्रीबोवांनीं वर्णिली आहे. ती त्यांच्या वेळेपेक्षांही आज दोन तपांत अधिकच निकृष्ट झाली आहे. श्रीमंतांजवळची श्री त्यांच्या व्यसनाला, आळसाला, कर्तृत्वशून्यतेला व कुटुंबकलहाला कंटाळून त्यांना सोडून परदेशगमन करीत आहे ! मध्यम स्थितींतले विद्यासंपन्न लोक पोटाची खळगी भरण्याकरितां हांजीहांजीचें तत्त्व अधिकाधिक शिकत आहेत. अल्पस्वल्प स्वहितासाठीं देशाचें केवढें कां अनहित होईना, तिकडे पहावयाचें नाहीं, असल्या वर्गांतले लोक अधिक उत्पन्न होत आहेत. बाकी याहीपेक्षां दुःखाची गोष्ट म्हणजे ही

कीं, पूर्वीं कांहीं मोठाल्या नोकऱ्या तरी आमच्या लोकांना मिळत, पण आतां हीन स्थिति वाढतच चालली आहे. पूर्वीं साहेबांचे कान व रावसाहेबांचें तोंड हीं जवळ जवळ तरी असत, आतां याउपर तीं होतील तितकीं दूर ठेवावयाचीं, अशी सरकारची उत्कट इच्छा दिसते ! खुद्द शास्त्रीबोवांचे वेळीं त्यांना कल्पनाही आली नसेल इतक्या हीन स्थितीला हा वर्ग या वीस वर्षांत येऊन पोहोंचला आहे* !! ही सामान्य जनांची स्थिति. यापेक्षांही राजेरजवाड्यांची स्थिति वाईट झाली आहे. 'जसा एखादा लाडका पोपट सोन्याच्या पिंजऱ्यांत ठेवावा, आणि त्यास बसावयाला काय, तर सोन्याची दांडी; पानपात्र काय, तर रत्नखचित पेला; खावयाला काय, तर मस्कतीं डाळिंबें; त्याचप्रमाणें त्यांचा सारा प्रकार आहे. वरील श्रीमंती पोपटांत व खुशाल वनोपवनांतून हिंडणाऱ्या व आकाशपंथानें स्वच्छंद भराऱ्या मारणाऱ्या राघूंमध्यें जितकें अंतर तितकेंच राज्यरूप कारागृहांत वागणाऱ्या व ऐषआरामाच्या धुंदींत लोळणाऱ्या आमच्या

---

* कांहीं वर्षांमागें रा. ब. दादोबा पांडुरंग यांचें हस्तलिखित आत्मचरित्र माझ्या पाहण्यांत आलें होतें. मराठी व्याकरण व केकावलीवरील यशोदापांडुरंगी टीका या सुंदर ग्रंथांचे हे कर्ते होत. यांचा जन्म शके १७३६ मधला. पहिल्या इंग्रजी पिढींतले हे प्रमुख होत. मुंबईस पहिली इंग्रजी शाळा झाली त्यांतल्या पहिल्या सहा विद्यार्थ्यांपैकीं हे होते. आपल्या आत्मचरित्रांत यांनीं त्या वेळच्या स्थितीचें फार सुंदर चित्र काढलें आहे ! सहामाहीच्या परीक्षेंत ( पहिल्या यत्तेंत ) पास झाल्याबद्दल दादोबांस सोनेरी पुठ्ठ्यांनीं मढविलेलीं तीन सुंदर पुस्तकें व रेशमी थैलींत साठ रुपये बक्षीस मिळालें होतें !!! शिक्षणाला एवढें मोठें उत्तेजन प्रथम असे. दादोबांच्या वेळेपेक्षां शास्त्रीबोवांच्या वेळीं स्थिति फार खालावली होती, शास्त्रीबोवांच्या वेळेपेक्षां आज फारच खालावली आहे, व 'पुढें आपल्या मुलाबाळांचें काय होणार, यांना पुरेशी मीठभाकर तरी कशी मिळणार, यांना शिकवून फायदा काय, शिक्षणांत घातलेल्या पैशांचें व्याजही फिटत नाहीं, बरें शिक्षण न द्यावें तर करावें तरी काय' अशी प्रत्येक पांढरपेशा पालकास मोठी विवंचना लागून राहिली आहे, व आमच्या लोकांचें, आमच्या देशाचें पुढें काय होणार ? या अत्यंत विकट प्रश्नानें पुढारी देशहितेच्छूंचीं मस्तकें भुग्यांसारखीं कोरून टाकलीं आहेत. सध्याची स्थिति व सरकारचें धोरण यांचा एकदम विचार केला म्हणजे आपल्या पुढील प्रजेच्या हिताविषयीची काळजी प्रत्येकाच्या काळजाला जबर धक्का देते.

नाटकी राजांत व एखाद्या सामान्य मनुष्यांत आहे.' आजच्या राजे-रजवाड्यांची स्थिति अशीही राहिली नाहीं. सोन्याची दांडी, रत्नखचित पेला व मस्कती डाळिंबें हीं तरी त्या भाग्यशील पोपटाच्या वांट्याला येतात, आमच्या राजांचें तितकेंही भाग्य राहिलें नाहीं ! त्यांच्या स्थिती-बद्दल आपण सामान्य मनुष्यांनीं अधिक विचार न करावा, हेंच ठीक आहे !

१९ इतिहासाच्या विस्तृत वाचनामुळें शास्त्रीबोवांच्या मनांत उत्कट स्वदे-शाभिमान जागृत झाला होता; व देशाच्या राजकीय स्थितीबद्दल त्यांना रात्रंदिवस वाईट वाटत असल्यामुळें केवळ सामाजिक प्रश्नांसंबंधानें त्यांनीं फारसा ऊहापोह केला नाहीं. उलट पुनर्विवाह, प्रार्थनासमाजादि नवीन संस्था, जातिभेद, असल्या विषयांवर व्याख्यानें देणारे व लेख लिहिणारे लोक असलीं भलतींच नवी लफडीं उत्पन्न करून समाजांत बेकी उत्पन्न करीत आहेत याबद्दल त्यांना वाईट वाटे. भरतखंडांत तरी धर्मा-भिमान हा देशाभिमानाहून लोकांच्या हाडींमांसीं अधिक खिळला आहे, ही ही गोष्ट या लोकांच्या नजरेस तितकी आलेली दिसत नाहीं. शास्त्रीबोवांचा देशाभिमान युरोपिअन लोकांचे इतिहास व सद्यःस्थिति पाहून उत्पन्न झाला होता; त्याच्या मूळाशीं उदात्ततम अशा पवित्र धर्मकल्पना नव्हत्या. त्याचप्र-माणें कांग्रेसभक्तांचें जें मुख्य तत्त्व कीं, मराठे, रजपूत, शीख, बंगाली, गुजराथी वगैरे प्रधान हिंदु उपजाति, तसेच मुसलमान, पारशी व हिंदुस्थानांत का-यम राहिलेले ख्रिस्ती लोक या सर्वांनीं आपापला प्रांतीय अभिमान सोडून एकमतानें व एक दिलानें वागावें; प्रत्येक पोटभागानें आपापल्या सामा-जिक व धार्मिक प्रश्नांचा उलगडा आपापसांत करून घ्यावा; हिंदु, मुस-लमान, पारशी हे सर्व सख्ख्या भावांप्रमाणें परस्परभेद विसरून ज्या दिवशीं एक होतील त्या दिवशीं हिंदुस्थानच्या राजकीय उन्नतीस प्रारंभ झाला म्हणून समजावें; ही जी राष्ट्रीयसभाभक्तांची मुख्य राजनीति तीही शास्त्री-बोवांच्या ग्रंथांत कोठें चमकत नाहीं व ती त्यांना पुरी पसंत पडली असती कीं नाहीं, याचाही वानवाच आहे ! याप्रमाणें देशाभिमान शास्त्री-बोवांत जागृत झाला होता खरा, पण त्या देशाभिमानाचें स्वरूप काय असावें, याचा त्यांच्या मनांतच नीट विचार झालेला नव्हता किंवा तो विचार

परिपक्क होण्यास लागणारा कालावधि व अनुभव शास्त्रीबोवांस मिळाला नव्हता; तो मिळाला असता म्हणजे शास्त्रीबोवांच्या देशाभिमानाचें खरें स्वरूप आपणांस कळलें असतें. आमचा स्वातंत्र्यनाश झाला, ही परम राष्ट्रीय आपत्ति होय, असा त्यांचा ठाम सिद्धांत असे. आत्मस्थितीचें यथार्थ ज्ञान बहुजनसमाजास करून देणें हें आपलें प्रधान कर्तव्य होय, असें ते मानीत. इंग्रज लोकांच्या संगतीपासून आपणांस तीन फायदे झाले आहेत, असें त्यांनीं अखेरच्या निबंधांत सांगितलें आहे. ( १ ) पाश्चात्यांनीं अनेक शतकें संपादन केलेलें ज्ञान व नवीन शोध करून वाढविलेलीं शास्त्रें यांचा आपणांस आयताच लाभ झाला आहे; ( २ ) व्यावहारिक कला—छापखाना, आगगाड्या, आगबोटी, तारायंत्र, प्रकाशालेख्य, गिरण्या वगैरे—यांनीं मानवी जातीचें अतोनात कल्याण केलें आहे व पुढेंही करणार आहेत, तेव्हां अशा अद्भुत कलांशीं आपला प्रथम परिचय झाला आहे; ( ३ ) देशाभिमान, जात्याभिमान, स्वाभिमान, अनुचित कर्मांपासून निवृत्ति, स्वातंत्र्याभिलाष, दैन्यवर्जन वगैरेविषयीं ज्या मानसिक स्थितीपासून स्फूर्ति होते ती स्थिति असणें हें देशोन्नतीचें प्रधान साधन होय. याशिवाय व्यापारवृद्धि, सर्व देशांशीं दळणवळण, मतस्वातंत्र्य वगैरेही अनेक फायदे इंग्रजी राज्यापासून झाले आहेत व त्या सर्वांचा आपण अगोदर फायदा घ्यावयाला पाहिजे, असें त्यांचें म्हणणें असे. या विचाराप्रमाणें आचार सुरू करण्यासाठींच शास्त्रीबोवांनीं निबंधमाला, केसरी व मराठा हीं पत्रें, किताबखाना, चित्रशाळा वगैरे संस्था अस्तित्वांत आणल्या. विचाराप्रमाणें आचार ठेवणें हें थोर पुरुषांचें मोठें लक्षण होय, व याप्रमाणें पाहूं जातां शास्त्रीबोवांची कर्त्या पुरुषांत गणना करण्यास बिलकूल हरकत दिसत नाहीं. राजकीय उन्नति ही सर्व सुधारणांच्या मूळाशीं आहे असें शास्त्रीबोवांच्या मनानें घेतल्यामुळें धार्मिक व सामाजिक प्रश्न त्यांनीं फारसे विचारांत घेतले नाहींत. ‘ लोकभ्रम ’ या निबंधांत मात्र भूतपिशाचें, शकुन, फलज्योतिष वगैरेसंबंधीं आमच्या लोकांत जे समज आहेत ते खोडून टाकण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. फलज्योतिष हें शास्त्र फार गहन आहे. या शास्त्राचे खरे मर्मज्ञ पुरुष फार विरळ असल्यामुळें व ढोंगी लोकांचाच सुकाळ झाल्यामुळें फलज्योतिषाची जिकडे तिकडे निंदा चाल-

लेली आढळते. शास्त्रीबोवांनीं या शास्त्रावर जो हल्ला केला तो मोठासा विचारानें केलासें वाटत नाहीं. शास्त्रीबोवांच्या वेळीं महाडकर ज्योतिषी असते तर त्यांचा लेख अधिक सौम्य झाला असता ! शकुनांतही दोन प्रकार आहेत. आगामि सुखदुःखांबद्दल अंतःकरणांत शुभाशुभप्रेरणा होत असतात, असा थोड्या लोकांचा तरी अनुभव आहे. मनांत विद्युच्छक्ति असते व फार अंतरावर असणाऱ्या सस्नेह जीवांना एकसमयावच्छेदेंकरून कांहीं विशिष्ट भावना होत असतात. शास्त्रीबोवांना एखादा योगाभ्यासी ज्योतिषी भेटला असता म्हणजे अंतःकरणाच्या व्यापारासंबंधानें व शकुनाच्या या पहिल्या बाजूसंबंधानें त्यांना थोडीतरी माहिती झाली असती. शकुनाच्या दुसऱ्या बाजूसंबंधानें मात्र शास्त्रीबोवांनीं जें लिहिलें आहे तें सर्व सुजनांना मान्य झालेंच पाहिजे. "पहिला मोठा अपशकुन विधवा स्त्रियांचा ! या करुणास्पद विषयाविषयीं क्षणभरही विचार करितांना ज्याचें हृदय अत्यंत खेदानें व संतापानें व्याप्त होऊन जात नाहीं, त्यास केवळ पाषाणहृदय व अधमाधम म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. स्त्रियांचें जिणें मुळींच पराधीन असल्यामुळें व संसारदुःखाचें मोठें ओझें त्यांच्यावरच नेहमीं असल्यामुळें त्यांची स्थिति एकंदरींत कठीणच; पण त्यांतूनही वैधव्याच्या योगानें त्यांचा सगळाच आधार एकदम तुटतो, तेव्हां त्यांच्या विपत्तीची तर सीमाच होते ...... केवळ दैवयोगानें किंवा यदृच्छेनें प्राप्त होणाऱ्या स्थितिविशेषावरून मनुष्यास मंगळ किंवा अमंगळ मानावें, हा केवढा अन्याय आहे ! जी अत्यंत सदाचरणानें आपलें आयुष्य क्रमून आपल्या कुलास तर काय, पण सगळ्या मनुष्यजातीस भूषण आणीत आहे,—कारण, मनुष्याचें अंतःकरण स्वभावतःच किती अस्थिर व दुष्ट असतें हें सर्वप्रसिद्ध आहे.—त्याच साध्वीचें दर्शन, पुरतें तेरा दिवसही जाऊं न देतां जो निर्लज्ज व विषयांध पुनः नवरामुलगा होऊन उभाच, अशा पुरुषानें, अशुभ मानावें हा केवढा उलटा न्याय ! ! आणि अशा निष्पाप स्त्रीचें दर्शन जर शुभ नव्हे तर सगळ्या कपाळभर जिनें कुंकवाचा पट्टा ओढला आहे अशा एखाद्या नगरभवानीचें...अगर बाजारबसवीचें, तिच्या केवळ बाह्य वेषावरून अत्यंत शुभ दर्शन झालें काय ? यासारखेच दुसरेही कित्येक वेडगळ अप-

शकुन. कोणी दाराबाहेर पडतो आहे इतक्यांत पुढें जर बोडका ब्राह्मण आला तर खुंटलेंच त्याचें जाणें ! मग हा ब्राह्मण चांगला सत्पात्र, सुशील सज्जन असाही कां असेना ! पण तोच जर एखादा महाशंख मोठी शालजोडी पांघरून व मोठ्या लपफ्याचा पदर लावून पुढे आला कीं शकुन उत्तम ! तसेंच कोणी क्लीबाचेंही दर्शन असेंच अशुभावह मानतात. हें करणें म्हणजे जें मनुष्याच्या स्वाधीनचें नाहीं त्याबद्दल उगीच विनाकारण त्यास हिणावणें आहे. ''

२०. ' गर्व ' हा निबंध मानसशास्त्रविषयक आहे, तरी त्याची मांडणी व्यावहारिक पद्धतीची आहे. शास्त्रीबोवांनीं गर्वाचे दोन प्रकार सांगितले आहेत. एक दोषरूप गर्व व एक अदोषरूप गर्व. संपत्तीचा, स्वरूपाचा, शरीरबलाचा किंवा विद्येचा गर्व वाहणें व इतरांस तुच्छ लेखणें हा दोषरूप गर्व होय. सहजगुणांविषयीं किंवा अन्यलब्ध स्थितिविशेषांविषयीं गर्व वाहणें हें वेडेपण होय. स्वसंवर्धित गुणांविषयीं योग्य अभिमान वाहणे व खल्दुर्जनांनीं मत्सरबुद्धीनें निंदा किंवा टवाळी चालविली असतां तिचा प्रतिकार करण्यासाठीं आत्मगुण गाणें हा अदोषरूप गर्व होय. हा दुसऱ्या प्रकारचा गर्व पुष्कळ मोठमोठ्यांना होता व राष्ट्रोन्नतीस्तव त्याची वृद्धि होणें अवश्य आहे, असें शास्त्रीबोवांचें मत आहे. भवभूति, जगन्नाथ पंडित, मोरोपंत, तुकाराम वगैरे कवींच्या व संतांच्या आत्मश्लाघापर उक्ति देऊन त्यांनीं हा निबंध संपविला आहे. त्यांच्या मतें "ज्याप्रमाणें समरांगणांत महावीरांच्या वीरोक्ति आत्मश्लाघापर असूनही ऐकणारांस त्रास न देतां उलट अत्यंत आल्हादप्रदच होतात, किंवा मानिनी स्त्रियांचा आपल्या रूपवत्वाचा अभिमान त्यांच्या सौंदर्यास विशेष रमणीय करून त्यांचीं निर्भत्सरपर भाषणेंही त्यांच्या वल्लभास अधिक हृद्य वाटवितो, त्याप्रमाणें थोर, गुणी पण अवमानित पुरुषरत्नांच्या दर्पोक्ति रसिक वाचकांस आनंद देतात. '' या निबंधांत वादग्रस्त फारसा कांहीं भाग नाहीं; पण अदोषरूप गर्वाचीं जीं उदाहरणें मालाकारांनीं दिलीं आहेत तीं मोठासा सारासारविचार करून दिलेलीं नाहींत. ' वाचामाचार्यतायाः पदमनुभवितुं कोऽस्ति धन्यो मदन्यः ' अशी गर्जना करणारा जगन्नाथ

पंडित किंवा ' पाय धरिल कविराय दुजा अशि काय लावणी करी । माय कुष्णाची व्याली या गगनाखालीं कविता सोलापुरीं ' असा दरडावणारा रामजोशी यांच्या अन्याधिक्षेपपर दर्पोक्ति; व 'मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे, ' ' आधीं होता संतसंग । तुका झाला पांडुरंग । ' असल्या तुकोबासारख्यांच्या कृतार्थतेच्या उक्ति एकाच दृष्टीनें लेखणें म्हणजे तक्रामृताची भेसळ करण्यासारखें वेडेपणाचें काम आहे! 'अणूएवढा थोकडा व आकाशाएवढा मोठा होऊन मी आतां उपकारापुरता उरलों आहें ' असें तुकोबा ज्या स्थितींत म्हणतात त्या स्थितीची कल्पनाही मालाकारांना आली नाहीं असेंच ह्मणावें लागतें. कोणीकडे जगन्नाथरामजोश्यादि राजस अहंकाराच्या तावडींत सांपडलेले पंडित लोक व कोणीकडे सात्विक अहंकाराच्याही वरच्या ब्रह्मपदावर नाचणोर तुकारामादि संत ! ! जगन्नाथ, मोरोपंत, तुकाराम यांना एका माळेंत बसविणें ह्मणजे ' युवानं मववानमाह ' या प्रसिद्ध चुटक्याप्रमाणें अरसिकतेची कमाल करणें होय. माझी अशी कल्पना आहे कीं, शास्त्रीबोवांची रासिकता इंग्रजी व संस्कृत ललित कविता वाचून एकमार्गी झाली होती व मराठी कविता वाचावयास ज्या प्रकारच्या हृदयवृत्ति लागतात त्या शास्त्रीबोवांत नव्हत्या किंवा त्यांचा विकास होण्यासारखी त्यांची परिस्थिति नव्हती ! तुकारामाच्या अदोषरूप गर्वाचें म्हणून शास्त्रीबोवांनीं आणखी एक मजेदार उदाहरण दिलें आहे, तें हें:—' संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।...।। तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ।। ' या अभंगावर शास्त्रीबोवा शेरा देतात: " या अभंगांत प्रस्तुत कवीनें सर्व संतांत आपलें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. " मालाकारांनीं या प्रसिद्ध अभंगांतून जें सार काढलें तें चुकीचें आहे ! वरील अभंगांत भागवतधर्मरूप इमारतीचें वर्णन केलें आहे. ज्ञानदेवानें तिचा पाया रचिला, नामदेवानें तिचा विस्तार केला, एकनाथानें तिच्यावर भागवतग्रन्थरूप पताका फडकाविली व आधींच पुऱ्या झालेल्या इमारतीचा कळस तुका झाला, असा या अभंगाचा अर्थ आहे. तुकोबांचे सारे अभंग वाचले,

---

१ हा अभंग तुकोबांचा नसून त्यांची शिष्यीण बहीणाबाई यांचा आहे असें बहिणाबाईचा हस्तलिखित गाथा मला मिळाला आहे त्यावरून उघड होतें.

ज्ञानेश्वरावर त्यानीं जे अभंग केले आहेत त्यांतली लीनता व भक्ति पाहिली, एकनाथी भागवताचीं तुकोबानें किती पारायणें केलीं होतीं व या ' जीवींच्या जीवनाबद्दल ' त्यांची किती भक्ति होती तें पाहिलें, नामदेवानें आपणास स्वप्नांत दर्शन देऊन राहिलेले अभंग पुरे करण्याची आज्ञा केली अशीं तुकोबांचींच अक्षरें पाहिलीं, या संतत्रयींविषयीं तुकोबांची किती पराकाष्ठेची पूज्यबुद्धि होती, हें त्यांच्या अभंगावरून, सांप्रदायपरंपरेवरून व वारकरी पंथाच्या एकंदर इतिहासावरून लक्षांत घेतलें ह्मणजे ज्ञानेश्वरादिकांपेक्षां तुकोबा आपणांस श्रेष्ठ समजत असत, असें मानणें किती चुकीचें आहे, हें कळेल ! ! ' ज्ञानाचा एका व नामाचा तुका ' ही ह्मण प्रसिद्ध आहे. शास्त्रीबोवांच्या लेखांनीं मराठी कवितेचा अभिमान आमच्यांत उत्पन्न केला हें खरें आहे; पण स्वतः शास्त्रीबोवांना मराठी कवितेचें अंतरंग कळलें नव्हतें ! ! असें अभावरूप कार्यापासून भावरूप कार्य क्वचितच होतें ! ! ! ते दीर्घायु झाले असते तर कदाचित् त्यांच्या वृत्तींत पालट झाला असता.

२१. हा निबंध लिहून शास्त्रीबोवांनीं दोन कार्यें साधिलीं; हा निबंध लिहिण्यांत त्यांचे दोन हेतु होते. एक प्रकट व एक अप्रकट. प्रकट हेतु त्यांच्याच शब्दांनीं सांगतों: " आमच्या देशाची सांप्रतकाळीं अत्यंत निकृष्ट अवस्था झाली असल्यामुळें तो सर्व जगाच्या व विशेषतः इंग्लिश लोकांच्या अवहेलनेस पात्र झाला आहे. तर जे खरे देशाभिमानी असतील व जे सत्यनिष्ठ असतील त्यांस प्रस्तुत निबंधाच्या या शेवटच्या भागांत आम्ही इतकेंच सुचविणार कीं, त्यांनीं वरील निंदेनें बिलकुल खचून जाऊं नये आणि मेकॉलेसारख्यांच्या मोठ्या नांवास भिऊन न जातां व मिशनरी, पाद्री व बाटे यांच्या शिव्यांस व रागास अगदीं न जुमानतां आपल्या देशावर वरील लोकांनीं जीं अज्ञानमूलक व दुराग्रहजन्य परोपरीचीं दूषणें बळेंच जाणूनबुजून दिलीं आहेत त्यांचें यथास्थित खंडण करावें. " आपल्या लोकांत स्वाभिमान, व स्वदेशाभिमान उत्पन्न व्हावा, या हेतूनें हा निबंध लिहिला आहे. दुसरा व अप्रकट हेतु हा कीं, या निबंधाच्यायोगानें शास्त्रीबोवांनीं स्वतःच्या गर्वरूप वृत्तीचें समर्थन केलें आहे. शास्त्रीबोवांस स्वतःच्या कर्तृत्वाचा, स्वभाषाधिपत्याचा, रसिकतेचा वगैरे अनेक प्रकारचा

गर्व होता.त्यांस त्यांचे समकालीन बरेच पुरुष गर्विष्ठ म्हणत.' शिवाजीच्या पूर्वीं व पश्चात् त्यांच्या योग्यतेचा जसा कोणी वीर झाला नाहीं, त्याप्रमाणें अलौकिक असा मी मराठी भाषेचा शिवाजी आहे, ' असें ते एकदां म्हणाले होते. त्यांच्या सर्व अहंकाराचें मूळ या वाक्यांत आहे. मराठी भाषेच्या इतिहासांत शास्त्रीबोवांना शिवाजीचें पद देणारा कोण रसिक भेटेल तो भेटो ! त्यांची योग्यता गद्यांत मोठी आहे खरी; पण ही पदवी ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, मोरोपंतादि महारथींची कामगिरी लक्षांत घेतां त्यांना मिळेलसें अगदीं वाटत नाहीं. त्यांच्या तत्त्वाप्रमाणें त्यांचा गर्व अदोषरूप आहे. एवढें खरें कीं, त्यांची महत्वाकांक्षा अतिशय मोठी व उज्ज्वल होती म्हणूनच त्यांच्या हातून एवढी तरी हालचाल झाली !

## ६ अवांतर विषय.

२२. निबंधमालेंतल्या मुख्य निबंधांविषयीं येथवर विचार झाला. या मुख्य निबंधांच्या, शिवाजी छापखान्यांत एक व आर्यभूषण छापखान्यांत एक अशा दोन आवृत्त्या मागाहून निघालेल्या आहेत; पण मूळ मालेचे जसे अंक निघाले होते तसेच्या तसे पुन्हा कोणीही छापले नाहींत. मालेचे मूळ ८४ अंक आज अगदीं दुर्मिळच झाले आहेत. चार वर्षे जुळवाजुळव करितां करितां मजजवळ सरासरी ७२ पर्यंत अंक जमा झाले आहेत. निबंधमालेच्या मुख्य निबंधांइतकेच महत्त्वाचे दुसरे भाग मालेंत पुष्कळ येऊन गेले होते. ते अलीकडे लोकांच्या फारसे पाहण्यांत नाहींत, म्हणून त्यांविषयींही चार शब्द सांगतों. आधीं:—

( १ ) पत्रव्यवहार हा फार महत्त्वाचा भाग होय. मालेची प्रसिद्धि किती झाली होती व मोठमोठ्यांस तिनें वादाच्या समरांगणांत खेंचून कसें आणलें, हें पहावयाचे असल्यास वाचकांनीं हा ' पत्रव्यवहार' पाहिला पाहिजे. वक्तृत्व या विषयावर निबंध लिहीत असतांना शास्त्रीबोवांनीं दयानंद सरस्वतीवर जे प्रहार केले होते ते न रुचून कोणी ' हितेच्छु ' वादास पुढें सरसावले. त्यांचे व मालाकारांचे दोनचार वेळां दोन हात झालेले आहेत. शास्त्रीबोवांनीं ' लोकभ्रम ' हा निबंध लिहितांना ' भूतपिशाचसमंधाचें सारें थोतांड आहे व अशा

अमंगळ प्राणी विश्वांत नसून मनुष्याच्या कल्पनेंत मात्र आहेत, ' असें ह्मटलें होतें. त्यावर बराच वादविवाद झाला व प्रत्यक्ष भूतसमंधांच्या बाधांनीं हैराण झालेल्या व भुतें व त्यांच्या चेष्टा नेत्रांनीं पाहिलेल्या गृहस्थांचीं १०।१२ पत्रें मालाकारांकडे आलीं होतीं व तीं बहुतेक त्यांनीं मालेंत छापलीं आहेत ! या विषयाचा ज्याला नाद असेल त्याच्या दृष्टीनें हीं पत्रें महत्त्वाचीं आहेतच; पण मनरंजनासाठींही हीं वाचण्यालायक आहेत. इंग्लंडच्या पहिल्या जेम्स राजाप्रमाणें ' पिशाचशास्त्रा ' वर कोणा मराठी ग्रंथकाराच्या मनांत जर पुस्तक लिहिण्याचें आलें तर हीं पत्रें त्याच्या फार उपयोगीं पडतील ! भाषापरिज्ञानांत 'हातचा मळ' याची उपपत्ति शास्त्रीबोवांनीं दिली होती, त्यावर कृ० प० गाडगीळ यांचें एक सुंदर पत्र छापलें आहे. तथापि निबंधमालेंत पत्रव्यवहार झाला तो मुख्यतः ' मोरोपंताची कविता ' या निबंधावरून झाला. कै० ज. बा. मोडक, काव्येतिहाससंग्रहकर्ते, हे जसे शास्त्रीय विषयांत निपुण होते तसे ते मराठी कवितेचेही मर्मज्ञ होते. त्यांचीं ज्योतिषरसायनादि शास्त्रांतल्या महत्त्वाच्या गोष्टींवर अत्यंत सोप्या भाषेंत लिहिलेलीं कांहीं पत्रें छापलीं आहेत; शिवाय त्यांचीं २।४ पत्रेंही मोरोपंतावरही आहेत. मोडकांशिवाय बामनरावजी ओक, केशवराव कानेटकर, गणेशशास्त्री लेले, का. पां. परब, यांचीं पत्रें निबंधमालेंत छापलीं आहेत, तीं फार महत्त्वाचीं आहेत. वामनरावजी ओक व कानेटकर यांची व शास्त्रीबोवांची जी खडाजंगी झाली ती पाहून त्या वेळच्या लोकांना मोठें कौतुक वाटलें असेल ! मेघ आणि विद्युत् यांच्या खडाजंगीनें जगताला पर्जन्यवृष्टीचा लाभ होतो, त्याप्रमाणें विष्णुशास्त्री व वामनरावजी यांच्या वाग्युद्धाचा फार मोठा लाभ मराठी वाचकांना झाला. या मल्लांच्या युद्धांत सत्याचा कांटा वामनरावजी ओकांकडेच ज्यास्त झुकतो आहे, तरी हा लोकोपकारी वाद उपस्थित करावयाला कारण प्रथम विष्णुशास्त्री झाले, हें निर्विवाद आहे. मराठी कवितेंत यमकांचा प्रथम प्रघात कोणी पाडला; छंदोबद्ध कवितेंत विविधवृत्तांत कविता करण्याचा अग्रमान कोणाला मिळाला पाहिजे; मराठी कवि पंडित होते कीं नाहीं व संस्कृत कवितेशीं त्यांचा परिचय होता कीं नाहीं; असल्या मुद्यांवर हा वाद झाला व यानें निबंधमालेचे कित्येक अंक

व्यापले. शास्त्रीबोवांचा मूळ लेख जितका महत्त्वाचा आहे तितकाच, किंबहुना थोडा ज्यास्त महत्त्वाचा हा पत्रव्यवहार व त्याचीं उत्तरें, हा भाग आहे. मराठी कवितेच्या पटांगणांत तुल्यबळ मल्लांची ही अदृष्टपूर्व झोंबी पाहून त्या वेळच्या प्रेक्षकांस परम कौतुक वाटलें असेल यांत कांहीं नवल नाहीं. वामनरावजी ओकांचा मराठी कवितेवरचा व्यासंग फार वर्षांचा होता. त्यांना या प्रबळ व आग्रही प्रतिपक्ष्यानें (मालाकार) चांगलेंच तरबेज केलें. काव्यसंग्रहाची सात वर्षे उत्तम प्रकारें सेवा करून मराठी कविता अधिक लोकप्रिय करणाऱ्या वामनरावजींना अशा प्रकारचें उपयुक्त शिक्षण निबंधमालेच्या आखाड्यांत मिळालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'मोरोपंतांची कविता' या निबंधानें निबंधमालेची अधिक प्रसिद्धि झाली व मराठी कवितेची गोडी व अभिमान मराठी वाचकांत उत्पन्न झाला; व किती चौकसपणानें व शोधक बुद्धीनें मराठी कविता वाचावयाला पाहिजे हें या निबंधावरच्या वादविवादानें मराठी वाचकांस शिकविलें. श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर या सरदारकवीचें मल्लिनाथावरचें पत्र व त्यावर मालाकारांचें उत्तर हीं वाचण्यासारखीं आहेत. मालाकारांनीं बापूसाहेबांच्या विद्याव्यासंगाची व रसिकपणाची तारीफही फार सभ्यपणानें व विनयानें केली आहे. याप्रमाणें मालेंतला पत्रव्यवहार व उत्तरें-प्रत्युत्तरें यांचें महत्त्व आहे. हा सारा पत्रव्यवहार कायमचा बुडूं देणें हें चांगलें नाहीं.

(२) **चमत्कारिक माहिती** या सदराखालीं बरीच ऐतिहासिक व वाङ्मयात्मक माहिती दिलेली असे. इंग्रजीमध्यें अशी माहिती एकत्र करून त्याचे लहान मोठे अनेक प्रकारचे कोश केलेले आहेत. प्रसिद्ध पुरुष, प्रसिद्ध स्थलें, अद्भुत गोष्टी वगैरे व्यवस्थेनें दिलेले कोश इंग्रजींत ज्या नमुन्यावर आहेत त्या धर्तीवर अशी माहिती द्यावयाचा शास्त्रीबोवांनीं उपक्रम केला होता. लुप्तकला, डायना देवीचें देवालय, एकरात्रप्रसंग, जुनियस, आल्प्स पर्वतावरील बोगदा, फलज्योतिष, शेक्स्पीअरची प्रतिकृति, रशियावर स्वारी वगैरेसंबंधीं पुष्कळ चमत्कारिक माहिती त्या त्या सदराखालीं दिलेली आढळते. पाश्चात्य वाङ्मयांतील विलक्षण माहिती मिळून शुद्ध मराठी वाचकांस

बहुश्रुतपणा व चौकसबुद्धि जेणेंकरून उत्पन्न होईल अशा हेतूनें हें सदर शास्त्रीबोवांनीं काढलें होतें.

( ३ ) **भाषापरिज्ञान** या सदराखालीं स्वत: शास्त्रीबोवांनीं कित्येक शब्दांची व लोकोक्तींची व्युत्पत्ति व इतिहास दिला आहे. हा प्रकार मराठी भाषेसंबंधानें केवळ अपूर्व आहे. हपूस, चाणाक्ष, मूळपदावर येणें, संक्रांत, उखळ पांढरें करणें, अशा कित्येक शब्दांची व लोकोक्तींची उपपत्ति त्यांनीं अति सुंदर तऱ्हेनें दिली आहे. हा विषय मराठी भाषेचा अभ्यास करणारांस अत्यंत महत्वाचा आहे. इकडे शास्त्रीबोवांच्या पूर्वीं कोणी लक्ष दिलें नव्हतेंच; पण त्यांच्या पश्चातही आज पंचवीस वर्षें या विषयाला कोणी शिवलें सुद्धां नाहीं ही फार खेदाची गोष्ट आहे ! म्याट्रिकच्या विद्यार्थ्याला Mac Mordie's Idioms चें पुस्तक अभ्यासावें लागतें व अशीं दुसरींही कांहीं पुस्तकें इंग्रजी भाषेंत आहेत. त्याच नमुन्यावर शास्त्रीबोवांनीं ' भाषापरिज्ञाना ' चा उपक्रम केला होता; पण केरोपंतनानांचे शोध व यंत्र ' गुंडा शिष्य ' न मिळाल्यामुळें जशीं गर्भांतच नष्ट झालीं, त्याप्रमाणें शास्त्रीबोवांनीं ज्या ज्या चांगल्या गोष्टींचा उपक्रम केला होता त्यांपैकीं बऱ्याच गोष्टी शास्त्रीबोवांच्या तोलाचे मनुष्य त्यांचे पश्चात् कोणी न झाल्यामुळें, तशाच राहिल्या आहेत. ' भाषापरिज्ञान; ' ' व्याकरणांतर; ' व ' अंतर्याम; ' 'भिक्षांदी' वगैरे ' कृत्रिम ' शब्द; या तीनही सदरांकडे कोणी मराठी भाषेच्या अभिमानी पंडितानें लक्ष द्यावयाला हवें आहे. बहुश्रुतपणा, कल्पकबुद्धि व चातुर्य हे तीनही गुण शास्त्रिबोवांत उत्तम प्रकारानें वसत होते, त्याचा हा एक लहानसा पुरावा आहे. मराठी भाषेंत निष्णात होऊं पाहणाराला संस्कृत भाषेची काव्यव्याकरणापुरती तरी माहिती असावी, असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. शास्त्रीबोवांना संस्कृत भाषेची व कवितेची किती गोडी होती व उत्तम प्रकारची रसिकता त्यांच्या ठायीं कशी वसत होती, याचा प्रत्यय लोकांस त्यांच्या ' कविपंचका ' वरून आलाच आहे. निबंधमालेंतही:—

( ४ ) सुभाषित, अर्थसादृश्य व साहित्य या तीन सदरांखालीं मनोरंजक सुभाषितें—त्यांच्या मराठी भाषांतरासह—व अलंकारांचीं

लक्षणें—मराठी कवींच्या उदाहरणांसह—द्यावयाचा त्यांनीं आरंभ केला होता. संस्कृत सुभाषितांचे जे अर्थ मालाकारांनीं केले आहेत ते सुलभ मार्मिक व सरळ आहेत. 'अर्थसादृश्य' या सदराखालीं इंग्रजी, संस्कृत या भाषांतलीं समानार्थक स्थळें दिलीं आहेत. त्यांवरून इंग्रजी व संस्कृत वाङ्मय शास्त्रीबोवा किती सापेक्ष बुद्धीनें वाचीत होते हें दिसतें.

( ५ ) उत्कृष्ट उतारेः—या सदराखालीं शास्त्रीबोवांचा आवडता कवि जो मोरोपंत त्याच्याच कवितेंतले बहुतेक उतारे घेतले आहेत. निबंधमालेंत पूर्वीं अनुपलब्ध अशी थोडीबहुत कविता छापली होती. कोणीं पोवाडा किंवा एकादें स्फुट प्रकरण पाठविलें तर शास्त्रीबोवा त्यास मालेंत जागा देत; हेंच काय, पण त्यांनीं स्वतः सुरस भाषांतरांसह मोरोपंतांचें 'मुक्तामाला' हें काव्य प्रथम छापलें व 'शिवार्या' छापण्यास प्रारंभ केला होता; पण त्याच वेळीं काव्येतिहाससंग्रह निघाल्यामुळें, हें प्रकरण त्यांनीं तिकडे पाठविलें. भर्तृहरीच्या शतकत्रयावरील वामनी श्लोकही शास्त्रीबोवांनीं थोड्या पण मार्मिक टीपा देऊन निबंधमालेंत छापून काढिले होते. सुभाषित अर्थसादृश्य, साहित्य ( हें प्रकरण अपुरेंच राहिलें गेलें ), उत्कृष्ट उतारे व मुक्तामाला आणि वामनी श्लोक हीं सर्व सदरें एकदम बारकाईनें पाहण्यासारखीं आहेत. शास्त्रीबोवांच्या वाचनांत जीं सुंदर स्थळें, श्लोक, सुभाषितें, अलंकार वगैरे येत त्यांचा रसास्वाद मालेच्या वाचकांसही घेतां यावा म्हणून त्यांनीं हीं लहान लहान सदरें काढलीं. या सर्वांवरून त्यांची अलौकिक रसिकता व भाषाशास्त्रनिपुणता ही दिसून येतात.

( ६ ) विनोदमहदाख्यायिकाः—हें एक मनोरंजक सदर निबंधमालेंत शास्त्रीबोवांनीं काढून त्याखालीं ऐतिहासिक थोर पुरुषांच्या —ग्रंथकारांच्या, मुत्सद्यांच्या व वीरांच्या—आख्यायिका, व विनोदपर चातुर्याचे अनेक चुटके दिले आहेत. करमणुकीच्या वेळीं हे वाचले असतां चित्ताल्हाद होऊन चातुर्य येतें. या सर्व चुटक्यांचे मागें एक लहानसें पुस्तक कोणीं तरी काढल्याचें स्मरतें. शास्त्रीबोवांच्या भाषेंत विनोदात्मकता पुष्कळ आहे. त्यांच्या मोठाल्या निबंधांतही विनोदात्मकतेमुळें

भाषेला गोडी आली आहे. ‘ रसातळची मराठी भाषा ’ हा लेख या संबंधानें वाचण्यालायक आहे.

( ७ ) ग्रंथावर टीकाः—या नांवाचा एक स्वतंत्र निबंधच शास्त्रीबोवांनीं लिहिला आहे व तदनुसार परीक्षणार्थ आलेल्या अनेक ग्रंथांवर त्यांनीं टीका केली आहे. पंडितांचा वेदार्थयत्न, तारानाटक, रसायनशास्त्र, भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश, ब्राह्मणांची गुलामगिरी, टॅपेस्ट वगैरे पुस्तकांवर दिलेले अभिप्राय पाहिले म्हणजे ग्रंथावर टीका करण्यांतही शास्त्रीबोवांचें धोरण काय होतें हें समजतें. त्यांनीं कांहीं चांगल्या ग्रंथांवर उत्कृष्ट अभिप्राय दिले आहेत, कांहींवर ते पुरे घसरले आहेत, कांहींची हांसत हांसत टर उडविली आहे, तरी याही बाबतींत लोकसुधारणेकडेच त्यांचें अधिक लक्ष दिसतें. शास्त्रीबोवांची टीका कितीही विनोदात्मक असली, त्यांत एखाद्या ग्रंथकाराचे पांच पाट काढून त्याची धिंड काढावयाची असली तरी कुत्सितपणा नसतो. हा विशेष आहे मनाचा मोकळेपणा, आपली चूक परत घेण्याची तत्परता, सूचकपणा, हे गुण शास्त्रीबोवांच्या टीकेंत हरहंमेष असतात. क्वचित् प्रसंगीं ते हट्टास पेटतात, दुराग्रह धरितात, नाहीं असें नाहीं; पण त्याही प्रसंगीं त्यांच्या मनाची सरळता नाहींशी होत नाहीं. लेखांत वांकडेपणा आणूनही मन मोकळें, स्वच्छ व आनंदी ठेवण्याची कठीण कला त्यांना साधली आहे. व्यक्तिसंबंधीं खाजगी द्वेष, वांकडेपणा त्यांनीं—कुंव्यांवर जातां येतां फटकारे मारले आहेत त्यांशिवाय—कोठेंही दाखविला नाहीं. ‘ ग्रंथावर टीका ’ या निबंधांत टीकाकाराच्या अंगीं मूळ ग्रंथाचें ज्ञान, सत्यप्रीति, शांतस्वभाव, सहृदयता वगैरे गुण अवश्य असावयाला पाहिजेत म्हणून त्यांनीं सांगितलें आहे व म्हटलें आहे; “ जे गुण असतील त्यांबद्दल ग्रंथकर्त्याची त्यानें वाजवी रीतीची तारीफ करावी व जे दोष असतील ते उघड निर्भीडपणानें स्पष्ट बोलून जावें. एकंदरींत, ज्याप्रमाणें खरा न्यायाधीश शत्रुमित्रभाव विसरून जाऊन केवळ उदासीनपणें कैद्याचा इन्साफ करितो; किंवा खरा व्यापारी खऱ्या वजनांनीं गिऱ्हाइकाच्या पदरांत चोख माप घालतो; किंवा खरा उत्कृष्ट चितारी जसा मूळचा चेहरा असेल तसाच हुबेहुब तसबिरींत उतरून देतो;

त्याप्रमाणेंच ग्रंथावर टीका करणारा असावा. " ग्रंथावर समर्पक किंवा खरमरीत टीका करण्यांत व तोललेला अभिप्राय देण्यांत शास्त्रीबोवांचा हातखंडा असे! त्यांची टीका निर्भीडपणें केलेली असावयाची, तींत गुळ-गुळीतपणा मुळींच नसावयाचा. ज्यानें प्रत्यक्ष आपल्या वडिलांवर टीका करण्यांत कसूर केली नाहीं, तो निःस्पृह टीकाकार दुसऱ्या कोणाची पर्वा करणार आहे ! तथापि एवढें खरें कीं, ज्यावर आपण टीका करतों त्याची विद्वत्ता, योग्यता, अधिकार शास्त्रीबोवा कधीं विसरत नसत. ज्या भावानें ते कृष्णशास्त्र्यांवर किंवा माधवराव रानड्यांवर, टीका करूं लागले तोच भाव खिस्ती मिशनऱ्यांवर किंवा जोतिबा फुल्यांवर टीका करितांना मात्र राहिला नाहीं ! बापूसाहेब कुरुंदवाडकरांसारख्या गुणी सरदारावर टीका करण्यापूर्वी आदरभाव व्यक्त केला आहे व लोकहितवादीवर कोरडे ओढ-तांना त्यांचें वय, त्यांचा अनुभव, त्यांचें इतिहासज्ञान, त्यांची लोकहि-ताची कळकळ इत्यादि गुणांचा उल्लेख करून मग अस्तऱ्या वर सरसावल्या आहेत; किंवा वेदार्थयत्नकर्ते पंडित यांच्या संस्कृतज्ञानाची व स्तुत्य उद्योगाची तारीफ करीत करीत त्यांच्या मूर्तिपूजा व ब्राह्मण यांजवरच्या भडिमारावर प्रतिभडिमार केला आहे ! खिस्ती मिशनरी, जोतिबा फुले वगैरे मडळींची त्यांनीं नुस्ती टर उडविली आहे ! तिला टीका हें भार-दस्त नांव सुद्धां शोभत नाहीं. टीकाकार ज्या योग्यतेचा असेल किंवा त्याचे आक्षेप ज्या किमतीचे असतील त्या मानानें शास्त्रीबोवांनीं आपली लेखणी चालविली होती. आणि खरेंच, गांडुळें वगैरे क्षुद्र जंतु काठीनेंच उडविले पाहिजेत; माशावगैरे प्राणी पंख्यांनीं वारले पाहिजेत; विंचु दग-डांनीं ठेंचले पाहिजेत; रेडा अंगावर आल्यास भोलशानच वारला पाहिजे. व्याघ्र, सिंह वगैरे हिंस्र पशु तीव्र शस्त्रांनींच जमीनदोस्त केले पाहिजेत ! एकाच प्रकारचें शस्त्र सर्वकाळ हातीं धरून चालावयाचें नाहीं. त्याला ता-रतम्य पाहिजे. ग्रंथांवर टीका करतांना शास्त्रीबोवांनीं हा तारतम्यभाव पा-ळला होता. तसेंच, टीकाविषयक ग्रंथकारांनीं आपले दोष टाकून द्यावेत अशा बुद्धीनें त्यांला व इतर ग्रंथकारांना मार्गदर्शक अशा मार्मिक सूच-नाही त्यांनीं जागोजाग केल्या आहेत.

२३. अनेक प्रकारचा पत्रव्यवहार व पत्रांस उत्तरें, चमत्कारिक मा-

हिती, भाषापरिज्ञान, सुभाषितें, अर्थसादृश्य, साहित्य, उत्कृष्ट उतारे, अनेक लहानमोठ्या ग्रंथांवरच्या टीका व विनोदमहदाख्यायिका इतक्या पोटविषयांवरील लिहिलेले भाग मुख्य निबंधांइतके महत्वाचे आहेत; पण खेदाची गोष्ट ही कीं, हे भाग निबंधमालेच्या मूळ अंकांशिवाय इतरत्र कोठेंच पहावयाला सांपडत नाहीत व मूळ अंक अनुपलब्ध झाले आहेत. हे फार महत्त्वाचे विषय अलीकडे लोकांच्या नजरेखालीं फारसे येत नाहींत. शास्त्रीबोवांचे मुख्यगुण देशाभिमान,बहुश्रुतपणा,विनोदपरता,रसिकता व तिखटपण हे या गौणविषयांतही चांगले प्रकट झाले आहेत. मला तर असें वाटतें कीं, या भागांशिवाय निबंधमालेचें संपूर्ण स्वरूप दिसत नाहीं. अलीकडे निबंधमालेंत हे सर्व भाग गाळले आहेत, व मुख्य निबंध तेवढे छापले आहेत; पण त्यामुळें अर्धी माला लोकांच्या दृष्टीस पडेनाशी झाली आहे. अर्ध्या मालेवरून लोक तिची परीक्षा करावयाला शिकले आहेत, यामुळें मालाकारांची खरी किंमत काय आहे, हें लोकांस कळेनासें झालें आहे. शास्त्रीबोवा देशाभिमानी पुरुष होते, हें सर्वांस मान्य आहे. त्यांचे अंधभक्त त्यांची भारीच स्तुति करितात ( एका गृहस्थानें विष्णुशास्त्री हे साक्षात् विष्णूचा अवतार होते असें म्हणून त्यांना व स्वतःला उपहासास्पद करून घेतलें होतें ! ) व दोषग्राही, त्यांनीं देशांत खोटा देशाभिमान पेरला व मोठमोठ्या लोकांची टवाळी करावयाला शिकवून पुण्यांतलीं पोरें चटोर मात्र केलीं, असें म्हणून त्यांची निंदा करितात! वस्तुतः ते कोणत्या देवाचा अवतारही नव्हते व त्यांनीं चटोरपणाही तरुणांस शिकविला नाहीं. शास्त्रीबोवांचे भक्त व निंदक मुख्य गोष्टीकडे दुर्लक्ष करून भलत्याच क्षुल्लक मुद्यावर आज वीस वर्षे तंडत बसले आहेत. त्यांचा प्रधान गुण हा होय कीं,त्यांनीं इंग्रजी वाङ्मयार्णवांत स्वदेशाभिमानपूर्वक बुड्या मारून त्याच्या अनेक तऱ्हा आपल्या देशबांधवांस दाखविल्या व देशभाषावैभव वाढविण्याचे मार्ग त्यांस दाखवून दिले. शास्त्रीबोवा मुख्यतः देशाभिमानी होते व तो देशाभिमान, देशभाषावैभव वाढविण्याचे मार्ग लोकांस दाखवून त्यांनीं प्रकट केला आहे. त्यांचे स्तुतिपाठक व निंदक या दोघांनींही त्यांच्यावर किंवा त्यांच्या ग्रंथांवर अनुकूल प्रतिकूल टीका करण्याचें सोडून

द्यावें व त्यांनीं सुचविलेल्या दिशेनें काम करून स्वभाषेच्या द्वारें लोकसेवा करण्यास झटावें, म्हणजे त्यांच्या श्रमांचें चीज होईल.

## ७ मालेचे मुख्य गुण.

२४. येथवर निबंधमालेच्या स्वरूपाविषयीं चार शब्द सांगितले. आतां मालेचे दोनचार ठळक गुण सांगतों. निबंधमालेचा पहिला मोठा गुण म्हणजे बहुश्रुतपणा. निबंधमाला आमूलाग्र काळजीपर्वक वाचणाऱ्या निव्वळ मराठी वाचकांसही इंग्रजी, संस्कृत व प्राकृत वाङ्मय आणि इतिहास यांसंबंधीं इतकी माहिती मिळेल कीं, त्यांतही अनायासें पुष्कळ चतुरस्रपणा येईल. शास्त्रीबोवांचें काव्येतिहासाचें वाचन अद्भुत होतें. डेक्कन कॉलेजांत विद्यार्थी असतांना त्यांनीं तेथील पुस्तकालयांतलीं इतकीं पुस्तकें वाचलीं होतीं कीं, तितकीं पुस्तकें वाचणारा दुसरा ग्याज्युएट डेक्कन कॉलेजांतून आज तीस चाळीस वर्षांत कोणी बाहेर पडला नाहीं. शास्त्रीबोवांनीं म्हणजे कोणत्या एका शास्त्राचें मननपूर्वक अध्ययन केलें होतें, असें नाहीं; पण वेळोवेळीं विविध विषय त्यांनीं चाळले होते. मराठी कविता सर्वसंग्रहापलीकडे वाचली होती असें नाहीं, तर कथेला, व चोरून तमाशाला जावयाचा त्यांना चांगला नाद असल्यामुळें, कृष्णशास्त्र्यांसारख्या पंडितांच्या सहवासाला असल्यामुळें व पुणें शहरासारख्या चळवळीच्या शहरांत सर्वदा वास्तव्य असल्यामुळें मराठी कवितेची व कवींची पुष्कळ लेखी व तोंडी माहिती त्यांना झाली होती. शास्त्रीबोवांच्या अंगीं ॲडिसनचा धिमेपणा व चौकसपणा असल्यामुळें, व बाळपणापासून पुढील ग्रंथकर्तृत्वाची दिशा त्यांनीं ठरवून ठेवल्यामुळें त्यांना जी जी माहिती जेथून जेथून मिळाली त्या त्या माहितीचा उपयोग त्यांनीं मोठ्या धूर्तपणानें निबंधमालेंत केला आहे. असो;. तर या अनेक कारणांमुळें निबंधमालेला बहुश्रुतपणा आलेला आहे. निबंधमालेचा दुसरा मोठा गुण विनोदात्मकता. इंग्रजींतले थॅकरे, स्विफ्ट, गोल्डस्मिथ वगैरे ग्रंथकारांचें ग्रंथ ज्यानें वाचले असतील त्याला या गुणाचें मर्म चांगलें कळेल. हरिदास ज्याप्रमाणें कथाप्रसंगीं श्रोत्यांच्या नेत्रांवर निद्रेचें पटल न येऊं देण्यासाठीं मधून मधून मनोहर गोष्टी, चुटके, सुभाषितें, कोट्या वगैरे

सांगून त्यांच्या चित्तवृत्ति आपल्याकडे आकर्षून घेतो, त्याप्रमाणें मालाकारही अनेक प्रकारच्या कोट्या वगैरेंनीं आपल्या लेखांत मनोरंजकपणा व विनोदात्मकता आणतात आणि या गुणामुळें ग्रंथ वाचतांना तो खालीं ठेवावासा वाटत नाहीं; इतकेंच काय, पण कांहीं कांहीं भाग विनोदपरतेमुळें इतके सुंदर वठले आहेत कीं, त्यांच्या कितीही आवृत्ति केल्या तरी 'प्रतिक्षण नवीच दे रुचि' याप्रमाणें ते सर्वदा आल्हादप्रद होतात. 'संपत्तीचा उपभोग' या निबंधांतल्या आमच्या इकडच्या श्रीमंतांच्या सुखसोहळ्यांचें वर्णन, मोरोपंतांच्या गुणदोषवर्णप्रसंगीं केलेली संस्कृत व प्राकृत भाषांच्या स्वरूपाची तुलना, माधवराव रानड्यांवरच्या टीकेचा शेवटचा प्यारिग्राफ, भाषादूषणांतला 'साधारण प्रार्थना' या पुस्तकावरचा अभिप्राय, वगैरे कित्येक भाग पाहिले असतां शास्त्रीबोवांच्या विनोदात्मक लेखांची आपणांस कल्पना येईल. हे ठळक प्रसंग सोडून दिले तरी सर्व ग्रंथभर या गुणाची छाया पडलेली आढळून येते. ही विनोदपरता विदूषकी थाटाची व आचरटपणाची नाहीं. मालेंत भारदस्तपणा व भाषेची व विचारांची प्रौढी सर्वत्र दिसून येते. उत्तम ग्रंथकाराला अवश्य असा भारदस्तपणा व विनोदात्मकता* या दोनही गुणांची

* विनोदात्मकता या गुणाची आपणांस नीट कल्पना यावी, यासाठीं त्याचा एकच मासला देतों:—सर अलेक्झांडर ग्रांट साहेबांनीं सरकारांकडून २५००० रुपये देववून कै. शंकर पांडुरंग पंडित यांजकडून इंदुप्रकाशांत जो तुकारामाचा गाथा छापविला त्या संबंधानें मालाकार म्हणतात:—"ज्यांच्या हातास मराठी पुस्तकांचा कधीं विटाळ सोसावयाचा नाहीं, व मराठी कवींचें तर ज्यांनीं कधीं मुखावलोकनही करावयाचें नाहीं, असे बडे बडे किताबधारी तुकारामापुढें लीन होऊन कोणीं त्याचें चरित्र लिहिलें, कोणीं अभंगांचें सूचीपत्र तयार केलें, कोणी ग्रंथप्रकाशन व टिप्पण हें काम पत्करिलें; तसेंच कोणीं साहेबांचे आज्ञेवरून मूर्तिपूजाजन्य पातकांचीं आगरें जीं आळंदी, देहू वगैरे स्थानें त्यांच्या दर्शनास जाऊन संतमंडळीचा आश्रय केला व अभंगांचीं बाडें जमा केलीं! असें होतां होतां कांहीं काळानें वरील संकल्प सिद्ध होऊन जो बिचारा कवि, लंगोटबहाद्दर किंवा घोंगडीवाल्या भक्तमंडळींतच रमावयाचा, किंवा फार झालें तर हरिदासांच्या कथाप्रसंगीं सत्कार पावावयाचा, त्यास एकाएकीं अरबी भाषेंतील अबू हसनासारखें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें! इंदुप्रकाश मुद्रणयंत्रालयांतील मुक्ताफळें आंगभर उधळलेलें,

शास्त्रीबोवांनीं आपल्या मालेला चांगली जोड करून दिली आहे. निबंधमालेचा तिसरा गुण **मार्मिकता.** शास्त्रीबोवांची रसिकता सर्वमान्य झाली आहे व पूर्वीं याबद्दल प्रसंगानें दोन शब्द सांगितलेच आहेत. विषयाची निवड; त्याच्या मुख्य मुद्यांची ठाकठिकीची मांडणी; उपमादृष्टांतादिकांनीं व अवांतर गोष्टींनीं विषय मनोहर करण्याची हातोटी; संस्कृत सुभाषितांनीं, लोकोक्तींनीं, म्हणींनीं, आख्यायिकांनीं, सृष्टिवर्णनपर किंवा स्वभाववर्णनपर माहितींनीं आपले लेख चतुराईनें व कौशल्यानें विणून काढण्याचें कसब, या सर्व प्रकारांत शास्त्रीबोवांची अलौकिक मार्मिकता दिसून येत आहे. फार काय, पण निबंधांच्या मथळ्यावर त्यांनीं जीं सुभाषितें घातलीं आहेत तींहि फारच मार्मिकपणानें योजलीं आहेत. कै. माधवराव रानड्यांवर टीका करतांना प्रथमच घातलेलें, 'अप्राप्तकालं वचनं बृहस्पतिरपि ब्रुवन् । प्राप्नुयाद्बुद्ध्यवज्ञानमपमानं च शाश्वतम् ।।' हें सुभाषित; लोकहितवादींच्या निबंधावरचा ' स्वजातीयविघाताय माहात्म्यं दृश्यते नृणाम् ' हा श्लोक; आमच्या देशाची स्थिति या निबंधावरचा ' फारच बरी निरयगति, परवशता शतगुणें करी जाच ' हा मोरोपंती आर्यार्ध वगैरे सुभाषितें त्या त्या निबंधांसह वाचलीं म्हणजे तीं किती समर्पकपणें योजिलीं आहेत हें कळून येईल. यांशिवाय निबंधमालेचे गुण म्हणजे तिची पुराणप्रियता; इंग्रजी विचार संस्कृत भाषेच्या धाटणीवर प्राकृतजनांस सहज कळतील अशा साध्या पण प्रौढ, सरळ पण काव्यात्मक, चित्ताकर्षक पण जोरदार भाषेंत प्रकट करण्याची हातोटी; विचारांची व सिद्धांतांची निश्चयात्मकता हे होत. या अनेक गुणांनीं मालेची

---

महावस्त्रांत शरीर लपेटलेलें व युनिव्हर्सिटीचे शानदार झगे घातलेले तरुण विद्वान डोक्यावर मोर्चेले उडवताहेत, व चवऱ्या ढाळताहेत अशा थाटानें तुकाराम महाराज फार दिवसांनीं आपल्या अभिधानाची सार्थकता पावून विराजमान झाले. महाराष्ट्र देशाच्या पहिल्या अधिपतीनें पाठविलेलें ऐश्वर्य परत लावून वरील कवीनें जी आपली हानि करून घेतली होती, तिची भरपाई दोन शतकांनंतर त्याच देशाच्या परद्वीपस्थ प्रभूनें करण्याचें मनांत आणलें कीं काय कोण जाणे ! ! ”

69082

रचना इतकी चित्तवेधक झाली आहे कीं, तींतले निबंध कितीही वेळां वाचले तरी तृप्ति होत नाहीं.

## ८ मालेनें केलेली राष्ट्रजागृति.

२५. निबंधमालेचें मुख्य धोरण जुने आचारविचार, जुनी धर्मपद्धति, जुनी भाषा, जुना इतिहास यांचें जुनेपण* कायम ठेवून तींत नवा दम, नवें कर्तृत्व उत्पन्न करण्याचें आहे. प्रख्यात मुत्सद्दी एडमंड बर्क, डिझ्रायली व ग्रंथकार जॉन्सन यांचें जें राष्ट्रहिताचें धोरण होतें तेंच शास्त्रीबोवांचें आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचें खरें सुख निराळें आहे व त्या स्वातंत्र्याचा पूर्ण उपभोग घेणारे परमहंसही निराळेच आहेत. समाजांत राहणाऱ्या व समाजसौख्य भोगणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर समाजाचें दडपण हें असलेंच पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या दुष्परिणामांकडे प्रत्येक समाजाच्या पुढाऱ्याचें लक्ष गेलेंच पाहिजे. रूढीचा, समाजबंधनांचा, परंपरेनें आलेल्या चालीरीतीचा व आचारविचारांचा निष्कारण उपमर्द करून समाजांत बेबंदशाही उत्पन्न करणारा स्वच्छंदी पुरुष समाजाचा हितकर्ता नव्हे. समाजांत पूर्वापार चालत आलेल्या पद्धति, उपासनेचे मार्ग, समाजसंस्था, धर्ममतें, चालीरीति, यांना अजीबात सोडणारा मनुष्य समाजाच्या राष्ट्रीय जुटीपासून अलग होतो व समाजबंधनें विस्कळित करून समाजाचा हितशत्रु होतो. असा पुरुष केवढाही विद्वान्, बुद्धिमान् व संपन्न असला तरी एका तऱ्हेनें तो समाजाचा शत्रुच समजला पाहिजे. हजारों वर्षांच्या परंपरा सोडून कोणीं पुरुषार्थ साधला आहे? विख्यात मुत्सद्दी डिझ्रायली याच्या धर्मविचारांचें समर्थन करतांना त्याचा चरित्रकार फ्राउडे हा म्हणतोः—

"Religion is a thing which grows and cannot be made. The central idea that man is a re-

---

* जुन्या वेडगळ चालीरीति किंवा खरे दोषास्पद प्रकार यांचें समर्थन शास्त्रीबोवांनीं कधीं केलें नाहीं. जॉन्सनच्या चरित्रांत "प्रथम पत्नीची आठवण अत्यल्प काळांत बुजून जाऊन आपल्याच स्वार्थावर केवळ नजर देऊन जीं अर्भकें त्यांस अपत्यासारखीं शोभतील, त्यांस विवाहपाशांत गोवून टाकणाऱ्या" पाषाणहृदयी पुरुषांचा समाचार घेण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं.

sponsible being is everywhere the same; but the idea shapes various forms for itself, into which legends, speculation and prevailing opinions necessarily enter. As time goes on, therefore, questions rise concerning this or that fact and this or that ceremony, which, if indulged, will create general scepticism. Such inquiries must be sternly repressed. In religion lies the only guidance for human life. The wise legislator, therefore, will regard the church of hisa country as the best support of the State. The subject will reflect that although observance may seem offensive and stories told of Gods may seem incredible; yet as a rule of action a system which has been the growth of ages is infinitely more precious than any theory which he could think out for himself. He will know that his own mind, that of any individual, is unequal to so vast a matter, that it is of such immeasurable consequences that although the body of his religion be mortal like his own, he must not allow it to be rudely meddled with. He may think about the legends of Zeus and Here as he likes, but he must keep his thoughts to himself; a man who brings into contempt the creed of his country is the deepest of criminals. The strength of the church lies in its hold upon the habits of the people and whoever breaks through the usages which time has made familiar and consecreted is equally dangerous and mischievous."

" धर्मवृक्षाची वाढ आपोआप होत असते, ती कोणाही एखाद्या दुसऱ्या व्यक्तीला करितां येणार नाहीं. मनुष्याला ईश्वरापाशीं आपल्या सदसत्कर्मांचा झाडा द्यावा लागतो, ही कल्पना सर्व धर्मांत आहे. पण याच कल्पनेचीं निरनिराळीं रूपें होऊन विशिष्ट मतें, विशिष्ट कथा व प्रचलित मतें यांत त्यांचा मिलाफ होतो व यामुळें निरनिराळ्या देशांत निरनिराळे धर्मपंथ होतात. कालांतरानें ही कथा खरी आहे कीं खोटी आहे, हा धर्मविधि योग्य आहे कीं अयोग्य आहे, यांविषयींचे प्रश्न उपस्थित होतात, व या प्रश्नांचा ऊहापोह करण्याची लोकांना चटक लागली म्हणजे पाखांड मत बळावतें. या प्रश्नांची चर्चाच होऊं देणें चांगलें नाहीं. ती करणारांना कडक शिक्षाच केली पाहिजे. व्यवहारांत धर्मासारखा उत्कृष्ट मार्गदर्शक दुसरा कोणीच नाहीं. आपल्या राष्ट्राचा उत्तम आधार म्हणजे आपला राष्ट्रधर्मच होय, हें ज्यानें ओळखलें त्यालाच मुत्सद्दी म्हणावें. यावरून हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कांहीं धर्मविधि आपणास कितीही उद्वेगजनक वाटले किंवा देवादिकांच्या गोष्टी अश्रद्धेय वाटल्या, तथापि आपण आपल्या बुद्धीनें जो स्वतंत्र विचार करून तत्त्वनिर्णय करूं त्यापेक्षां अनेक शतकांच्या परंपरेनें जो मार्ग रूढ झाला आहे तो अनंतपटीनें अधिक श्रेयस्कर होय. विचारी मनुष्याला हेंही कळून येईल कीं, हा विषय त्याच्या किंबहुना कोणत्याही व्यक्तीच्या आकलनशक्तीच्या आटोक्यांतला नाहीं, व मनुष्यदेहाप्रमाणें जरी त्याच्या धर्माचा डोलारा ढिसूळ असला तरी त्यानें त्याच्याशीं यत्किंचितही दांडगाई करितां उपयोगी नाहीं. त्याला देवादिकांच्या गोष्टी जरी खोट्या वाटल्या तरी त्यानें आपले विचार आपल्यापाशींच ठेवले पाहिजेत. जो मनुष्य आपल्या राष्ट्रीय धर्माची उघड निंदा करून तो तिरस्कारार्ह करितो, तो खुनी लोकांपेक्षांही अधिक गुन्हेगार समजला पाहिजे! धर्माचें बळ बहुजनसमाजाच्या चालीरितींत असतें व अनेक पिढ्यांच्या परंपरेनें परिचित झालेल्या व पूज्य वाटत असलेल्या आचारपद्धतींचें जो उल्लंघन करतो तोही तितकाच भयंकर व दुष्ट समजला पाहिजे." फ्रान्स देशांत जी मोठी राज्यक्रांती झाली तिच्या कार्यकारणाची उपपत्ति लावीत असतांना एडमंड बर्कनेंही अशाच तऱ्हेचे उद्गार काढले आहेतः—

" We are afraid to put men to live and trade each on his own private stock of Reason, because we suspect that this stock is small in each man, and that individuals would do better to avail themselves of the general bank and capital of nations and of ages. Many of our men of speculation, instead of exploding general prejudices employ their sagacity to discover the latent wisdom that prevails in them."

तो म्हणतो:—" व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वावर प्रत्येक मनुष्याला त्याच्या विचारांप्रमाणें वागण्याची सवड ठेवली तर परिणाम फार वाईट होतील, अशी आम्हांला भीति वाटते; कारण कोणत्याही एका व्यक्तीची विचारशक्ति ही पंगु असणारच. अनेक पिढ्यांच्या व राष्ट्रांच्या विचारांचें जें आयतेंच फळ आपणास प्राप्त होतें त्याचा आपण उपयोग करून घेतल्यास आपलें हितच होईल. शहाणे मुत्सद्दी लोकसमूहाच्या समजुतींची हेळणा करीत नाहींत, तर त्या समजुतींच्या मुळाशीं जें गुप्त तत्त्व असतें, तें आपल्या अकलेनें शोधून काढतात." व्यक्तिस्वातंत्र्याचें आमच्या इकडे जें बंड माजलें आहे, त्याचाही परिणाम लोकांना सामाजिक बाबतींत स्वेच्छाचारी व धार्मिक बाबतींत पाखांडी करण्यांत होऊं लागला आहे !! ही स्थिति फार अनिष्ट आहे. सर्व सामाजिक बाबतींत स्वेच्छाचार फार बोकाळूं लागला आहे व पूर्वींचीं बंधनें तटातट तुटून जाऊन त्याच्या जागीं नवीं बंधनें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य कोणाही पुढाऱ्यांत नाहीं. हिंदु समाजांतल्या चालीरीति व आचारविचार सुटत चालले व इंग्रजींतल्या खरोखर चांगल्या अशा ज्या कांहीं चालीरीति आहेत त्यांचा अपरिचयामुळें स्वभावादिकांवर पूर्ण अंमल बसत नाहीं. यामुळें धड पूर्वींचें हिंदुत्वही नाहीं व नवें युरोपियनत्वही नाहीं, अशी त्रिशंकूसारखी हिंदुसमाजाची स्थिति होत चालली आहे. ही आपल्या समाजांत जी दुफळी झाली, आहे, ती इंग्रजी

राज्य व इंग्रजी विद्या यांच्या प्रभावामुळें! आपला धर्म, आपली भाषा, आपला देश यांविषयीं शास्त्रीबोवांनीं जी सतत आठ वर्षें ओरड केली तिचा हेतु हा कीं, वर जो स्वाभिमानाविरुद्ध सुशिक्षितांच्या मनाचा प्रवाह चालला होता त्याला कांहींतरी अडथळा आणावा आणि हा पाश्चात्य कल्पनांचा जो पूर आम्हांवर आला व आम्हांस आपल्या नव्या वेगानें अधोगतीला नेत आहे, त्याला अडथळा आणण्यासाठीं शास्त्रीबोवांनीं निबंधमालारूप मोठा बांध घातला. या बांधानें आमचें पुष्कळच कार्य झालें आहे. आमचा धर्म, आमची भाषा, आमच्या चालीरीति, आमचा देश यांविषयीं इ. स. १८८०च्या पूर्वीं आमच्या सुशिक्षितांत जी तुच्छबुद्धि वसत होती, ती बराचशी जाऊन हळूहळू त्यांजविषयीं नव्या दृष्टीचा आदर वाटूं लागला आहे. तुळशीची पूजा करणाऱ्या धर्मपत्नीला लाथ मारून तुळस उपटून टाकणारे पति उत्तरोत्तर कमी होऊं लागले व आणखी कांहीं वर्षांनीं असा काळ येईल कीं, सुशिक्षित स्त्रीपुरुष तुळशीची पूजा मनोभावानें करूं लागतील. तुच्छबुद्धीचा काळ गेल्यावर उपेक्षाबुद्धीचा काळ येतो व त्याच्यानंतर आदरबुद्धीचा काळ येऊन हातानें क्रिया घडूं लागते. क्रिया करणारे व बोलल्याप्रमाणें वागणारे पुरुष राष्ट्रांत उत्पन्न होऊं लागले, कीं देशाचा भाग्योदय खास होणार म्हणून समजावें. निबंधमालेनतर आज पाव शतकांत आपल्या देशाच्या वडामोडींत पुष्कळच फरक पडला आहे. धर्माविषयींची तुच्छबुद्धि तर गेलीच, पण आज उदासीनता मात्र आहे. ही जाऊन धर्माविषयींची खरी खरी जागृति पुढील पांचपन्नास वर्षांत होईल, अशीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. आपला इतिहास, आपलें राजकारण व आपली भाषा यांविषयीं मात्र शास्त्रीबोवांनीं जें कार्य केलें त्याचीं फळें चांगल्याच प्रकारें दिसून येत आहेत. जुन्या बखरी, कागदपत्र, इतिहास यांचा जीर्णोद्धार करावयाचा शास्त्रीबोवांनींच प्रारंभ केला होता म्हटलें तरी चालेल. काव्येतिहासाशीं प्रथम त्यांचाच संबंध होता. पुढें पुढें ऐतिहासिक थोर पुरुषांचीं नाटकें, चरित्रें, बखरी वगैरे पुष्कळ ग्रंथ मराठींत होऊं लागले. पारसनीस, वासुदेवशास्त्री खरे व राजवाडे यांचे उद्योग चाललेच आहेत व अद्याप ते लोकांपुढें आहेत. राजवाडे यांनीं आजवर मराठ्यांच्या इतिहासाचीं पुष्कळच साधनें प्रसिद्ध केलीं

आहेत, व अलीकडे त्यांनीं आपला मोर्चा कवितेकडेही फिरविला आहे. राजवाडे यांचीं कित्येक मतें लोकमान्य होणार नाहींत व त्यांचें इतिहास-संशोधनाचें धोरण पक्षपातीपणाचें आहे, यांत बिलकूल शंका नाहीं;तथापि त्यांची स्वसुखनिरपेक्षता, सततोद्योग व बुद्धीची व्यापकता हे गुण अगदीं अलौकिक आहेत. निबंधमालेनें ज्या अनेक लोकांची कार्याकडे प्रवृत्ति केली त्यांत राजवाडे यांच्या तोलाचा दुसरा कोणी दिसत नाहीं. राजवाडे हे अचाट बुद्धीचे व जबरे व्यासंगी आहेत, व शास्त्रीबोवांत जो धर्मबुद्धीचा अभाव होता त्याचा उत्कर्ष जरी त्यांत झालेला आहे,तरी त्यांच्या विविध शोधांमुळें व उद्योगामुळें काव्येतिहासंशोधनाला चांगलें चालन मिळालें आहे हें खास. निबंधमालेनें राजवाडे हा एकच कर्ता पुरुष निर्माण केला एवढेंच नव्हें, तर अनेक तऱ्हेचे कर्ते पुरुष तिनें उत्पन्न केले आहेत. शास्त्रीबोवांनीं ज्याचे बाळंतपणाचे हाल सोसले व ज्याला दोन वर्षेपर्यंत पोसलें तो त्यांचा लाडका 'केसरी' पुढें केवढ्या वैभवाला चढला! पंचवीस वर्षांत त्यानें केवढी जबरदस्त राष्ट्रसेवा केली आहे व शास्त्रीबोवांचीं तत्त्वें जीं शेंदोनशें लोकांसच कळलीं होतीं त्यांचा प्रसार त्यानें महाराष्ट्रांत, दरोबस्त प्रांतांत व जातींत, केवढ्या अवाढव्य प्रमाणावर केला आहे, हें आज कोणांस ठाऊक नाहीं? पंचवीस वर्षांत महाराष्ट्रांत एकट्या 'केसरी'नें जें राष्ट्र-कार्य केलें आहे, तें बाकीच्या सर्व संस्थांनीं मिळून केलेल्या राष्ट्रकार्या-पेक्षां अधिक महत्त्वाचें व व्यापक आहे. इंग्रजी राज्याची, राज्यपद्धतीची व इंग्रजांच्या गुणदोषांची माहिती महाराष्ट्रास 'केसरी'नें करून दिली आहे व अनेक प्रकारच्या उद्योगांस 'केसरी'ची उठावणी व साह्य झालें आहे. शास्त्रीबोवांनीं आमच्या देशस्थितीची आम्हांस थोडीशी कल्पना आणून दिली व राष्ट्राचा पुढारी कसा असावा, हें प्रस्तुतच्या केसरी-कारांनीं (टिळकांनीं) आपल्या आचरणानें दाखवून दिलें आहे. निबंधमालेंतले निबंध शेंपन्नास वर्षांनंतर लोकांनीं वाचावयाचे सोडून दिले व कदाचित् निबंधमाला बुडाली (इडा पिडा टळो आणि अमंगळ पळो!) तरी महाराष्ट्राच्या भावी उन्नतीचा पाया तिनें घातला व शेंकडों बुद्धिमंत

कार्यकर्त्यांस ती प्रवर्तक झाली, ही तिची कीर्ति कायम राहील व उत्तरोत्तर वाढत जाईल.*

२६. खुद्द निबंधमालेनें जें कार्य केलें त्याचें येथवर दिग्दर्शन केलें. मालेच्या उत्पादकाचे पुढचे हेतु पोटांतल्या पोटांत राहून गेले याबद्दलचा विचार मनांत आला म्हणजे महत्‌दुःख होतें. निबंधमालेचा 'उपसंहार' करण्याचें मुख्य कारण, स्वतन्त्र शाळा, स्वतंत्र वर्तमानपत्रें, इत्यादि नवीन सृष्टींत येऊन पडल्यामुळें, शास्त्रीबोवांचीं व्यवधानें फार वाढलीं, त्यांची उद्योगपरंपरा वृद्धिंगत झाली व नियमित वेळीं मजकूर तयार करणें दुर्घट झालें हें होय; तथापि या कारणांच्याही पोटांत आणखी एक कारण होतें. शास्त्रीबोवांच्या मनांत लहान लहान निबंध लिहिण्यापेक्षां स्वतंत्र विषयांवर स्वतंत्रपणें ग्रंथ लिहून एक 'ग्रन्थमाला' गुंफावयाची होती. 'निबंधमाले'पेक्षांही ही ग्रंथमाला किती भारदस्त व महत्त्वाची झाली असती, याचें अनुमानही आज करवत नाहीं. अठरा वर्षांचे होतांच शास्त्रीबोवांच्या गळयांत थोरल्या शास्त्रीबोवांनीं शालापत्रकाचें संपादकत्व घातलें. हें काम चार वर्षे केल्यावर सरकारचा घुस्सा होऊन शालापत्रक बंद पडलें व शास्त्रीबोवांस स्वतन्त्रपणानें निबंधमाला काढावी लागली. अठरा वर्षांचें सतत वाचन, व बारा वर्षांचे लेखनकर्तृत्व यांचा फायदा आम्हांस कोठें मिळूं लागावयाचा समय येतो, तोंच निर्दय काळानें शास्त्रीबोवांस आमच्यांतून उचलून नेलें. त्यांच्या अकालिक मृत्यूनें झालेली हानि कशानेंही भरून यावयाची नाहीं. निबंधमालाकार आज हयात असते तर मराठी भाषेची स्थिति किती सुधारली असती! म्हाताऱ्या आईबापांचा एकुलता एक गुणी मुलगा आपल्या कर्तबगारीनें जगविख्यात व्हावा, त्याच्या कीर्तिसूर्याची प्रभा नुकतीच कोठें पूर्वाक्षितिजावर पडूं लागावी,

---

* शास्त्रीबोवांच्या भक्तांस व मुख्यतः त्यांची पुण्यतिथि पाळणाऱ्या या पुण्याच्या उद्धर्तनप्रवर्तक मंडळीस माझी अशी आग्रहाची विनंति आहे कीं, त्यांनीं मालेचें सर्व मूळ अंक जमवून त्यांतला कोणताही भाग न गाळतां जसेच्या तसे छापून काढावे. मुख्य निबंधांइतकाच इतर भागही महत्त्वाचा आहे, हें मागें दाखविलेंच आहे. तरी तिकडे लक्ष देऊन हें काम कोणीं तरी अवश्य केलें पाहिजे.

तोंच त्यावर अचानक काळानें झडप घालावी, म्हणजे त्यांस जसें महत् दुःख होईल तसें दुःख शास्त्रीबोवांच्या मरणानें मराठी भाषेस व महाराष्ट्रास झालें आहे ! मालेचा उपसंहार वाचूं लागले व पुढील कर्तव्याची जी दिशा शास्त्रीबोवांनीं रेखून ठेविली होती ती तशीच राहून गेली हें पाहिलें, म्हणजे अत्यंत खेद होतो. आधीं विद्यावनांत विहार* करणारे स्वच्छंदी हंस विरळा व त्यांत शास्त्रीबोवांसारखा परम रसिक, उद्योगी, उत्साही, व कर्तृत्ववान् पुरुष तर फारच विरळा. त्यांच्या महत्त्वाकांक्षा त्यांचे विचार, त्यांचें कर्तृत्व व त्यांचा उल्हास हे त्यांच्याबरोबरच लयास गेले हें पाहून चित्त नुसतें करपून जातें, हृदयावर निराशेचें पटल येतें, व पराकाष्ठेचें औदासीन्य येतें. तारुण्याच्या व कर्तृत्वाच्या ऐन उमेदींत शास्त्रीबोवांवर काळाची उडी पडली, हें पाहून भवभूतीच्या खालील श्लोकाची आठवण होतेः—

आपूर्णश्च कलाभिरिंदुरमलो यातश्च राहोर्मुखं
संजातश्च घनाघनो जलधरः शीर्णश्च वायोर्जवात् ।
निर्वृत्तश्च फलेग्रहिर्द्रुमवरो दग्धश्च दावाग्निना
त्वं चूडामणितां गतश्च जगतो यातश्च मृत्योर्वशम् ॥ १ ॥

असो. शास्त्रीबोवा तर गेले; पण त्यांचे ग्रंथ व कर्तृत्व हीं मागें राहिलीं आहेत. शास्त्रीबोवांनीं दाखविलेल्या अनेक मार्गांपैकीं एकेका मार्गाचें आस्थेवाईकपणानें अनुकरण करून मराठी वाङ्मयाचें वैभव वाढविण्याची उमेद आमच्या तरुण मित्रांनीं धरावी, एवढीच त्यांस विनंति करून व शास्त्रीबोवांसारखे अनेक कर्तृत्ववान् पुरुष आमच्या देशांत उत्पन्न होवोत, अशी परमेश्वराची प्रार्थना करून मी आपलें व्याख्यान पुरें करितों.

---

* विद्यार्थिदशेंत असल्यापासून शास्त्रीबोवांनीं आपला भावी कार्यक्रम रेखून ठेवला होता. 'आपल्या देशबंधूस गीर्वाण व आंग्लभौम पुष्पांकुरांतील मधुबिंदूंचा व सौरभाचा यथावकाश व यथाशक्ति लाभ करून द्यावा' असा त्यांचा बाळपणींच निग्रह झाला होता. त्याप्रमाणें त्यांनीं ३२ वर्षांच्या वयांत मोठीच कामगिरी करून दाखविली यांत शंका नाहीं.

# निबंधमालेंतलीं अवतरणें.

(१)

चोविसाव्या अंकाच्या शेवटीं उपसंहारात्मक कांहीं मजकूर आहे त्याचे प्रारंभीं पुढील 'मंगलाचरण' आहे:—

"पहिल्यानें सर्वधर्मसंमत जो सुज्ञसंप्रदाय त्यास अनुसरून जगन्नियंत्यास येथें सद्भावपूर्वक प्रणाम करतों. अवघ्या जीवसृष्टीची कृति केवळ त्याच्याच सत्तनें चालली असल्यामुळें ज्ञानवान् प्राणी जो मनुष्य त्यानें आपल्या महाधिकाराप्रमाणें आपल्या वक्तृत्वाचें मूळ ओळखून त्याशीं अनन्यभावेंकरून नम्र असावें हें त्यास उचित होय. यास्तव प्रस्तुत देशकार्याचें दुसरें वर्ष ज्याच्या कृपेनें निर्विघ्नपणें तडीस लागलें त्याचे कृतज्ञताबुद्धीनें व आनंदभरानें येथें उपकार आठवतों"

(२)

त्याच म्ह० २४ व्या अंकांत एका 'हितेच्छूचें' पत्र व त्यास उत्तर छापलें आहे. 'अलीकडच्या सुधारणापद्धतींची केवळ विटंबनाच करण्यांत तुम्हांस भूषण किंवा मौज वाटतें हें आश्चर्य होय' असें म्हणून हितेच्छूनें दयानंदसरस्वतीप्रभृतींवर मालाकारावर व्यर्थ घसरले आहेत असा त्यांजवर आक्षेप केला आहे. आक्षेपाच्या खंडणांत मालाकार म्हणतात. "इंग्रेजांच्या ऐश्वर्यास व विद्योत्कर्षास भुलून जाऊन, आणि इग्रेज ग्रंथकारांच्या अज्ञानमूलक गर्वोक्ति व पाद्रीसाहेबांचे हेकटपणाचे व मतलबाचे लेख व भाषणें हीं सर्व खरीं मानून, आमच्या नवीन विद्वानांनीं सर्व मतें असा एक जबरदस्त सिद्धांत करून टाकला होता कीं, जुनें तेवढें सर्व अतिनिंद्य व नवें इंग्रजी तेवढें सर्वथा स्तुतीस पात्र हा समज कांहीं अंशीं स्वाभाविकच होता. कोणा एका चतुर ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, आपण मनुष्यें हीं सरड्यासारखीं आहों, त्याचा रंग जसा वरचेवर बदलतो त्याप्रमाणेंच संगतिविशेषानें आपलेही गुण, रुचि व मतें हीं नेहमीं पालटत

असतात. या नियमावरून पाहतां गेल्या १०।२० वर्षांमागच्या लोकांच्या मनांवर सांगितलेला संस्कार झाला तर यांत कांहीं मोठेंसें विचित्र नाहीं. कोणत्याही गोष्टीचें खरें स्वरूप व योग्यता समजून येण्यास कांहीं तरी काळ जावा लागतोच. तर याप्रमाणें ही नवी खळबळ वरील लोकांस सर्वांशीं श्रेयस्करच वाटून पाहिलें अगदीं सर्व मोडून टाकण्याचा किंवा तें पालटून त्यास नवें स्वरूप देण्याचा वरील लोकांचा सारखा प्रयत्न चालला होता व अद्यापही बराच चालला आहे. आमच्यांत प्रमुख म्हणविणाऱ्या लोकांस स्वतःची योग्यता, ज्ञान व कर्तृत्व हीं जरी केवळ अकटोविकट वाटतात व जगांत आजपर्यंत महान् महान् पुरुषांनीं जीं कृत्यें केलीं तीं करण्याचा पतकरही जरी ते खुशाल घेतात तरी वस्तुतः पाहिलें तर वरील तिन्ही गुणांत त्यांचा कमतरपणा पुष्कळच आहे असे सर्व यथार्थ पाहणारांस वाटेल. हल्लीं थोरापासून लहानापर्यंत ज्यानें उठावें त्यानें सगळ्या हिंदुस्थानावर धाड घालून त्यास सांप्रत जी अवस्था प्राप्त झाली आहे ती अशाअशामुळेंच झाली आहे व ती अमुकअमुक उपाय केले असतां खास दूर होईल वगैरे यथेष्ट कल्पना निःशंकपणें करावी यासारखें दुसरें काय बरें हास्यास्पद आहे ? वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल कीं प्रभू येशू, महंमद, राम मोहनराय, किंवा दयानंद स्वामी यांपैकीं आम्ही कोणाचेही चेले नसून त्यांच्या पंथाकडे आमचा विशेष ओढा आहे असेंही नाहीं. वरील मार्गाच्या अनुयायांस सांप्रत चालू असणारा हिंदुधर्म जसा केवळ उपहास्य व उच्छेद्य वाटतो, त्यांत गुणाचा लेशही नसून दोषांनीं मात्र तो ओतप्रोत भरला आहे व या भरतखंडाच्या उन्नतीस तोच मुख्यतः जबरदस्त अडथळा आहे असें वाटतें, तसेंही पण आम्हांस बिलकूल वाटत नाहीं. मेकॉलेमिल्लसारख्या महापंडितांनीं बिचाऱ्यांनीं क्षणमात्रही विचार न करितां आमच्या देशावर आपली चटोरपणाची लेखणी खुशाल फिरविली आहे; व तेंच व्रत पुढें जगत्तारकांच्या प्रेषितांनीं व त्यांच्या मुलथापीस भुलून आकाशाच्या राज्याचा तुकडा ज्यानीं आपलासा करून घेतला अशा बाटे मंडळीनें जर आज ३०।४० वर्षें कायावाचामनेंकरून निर्बाध चालविलें आहे; फार तर काय पण आमचे देशबंधु व आमच्या हिताची अतोनात कळकळ बाळगणारे जे महाविद्वान्

व महावक्ते बाबू प्रतापचंद्र व साक्षात् जगद्गुरु दयानंदजी यांसही हास्यरस यथास्थित पिकाविल्याखेरीज आपलें व्याख्यान रंगलेसेंच वाटत नाहीं; तर तोच श्लाघ्यक्रम पुढें चालविण्यास आमच्या निबंधमालेसच कां अडकाठी असावी? आमच्या जुन्या लोकांत व त्यांच्या आचारांत हास्यरसाला पुष्कळ विषय आहे, हें जसें आमच्या नव्या मंडळीनें जगजाहीर करून टाकिलें आहे त्याच न्यायानें नव्या मंडळीचे गुणदोष विशेष उघडपणें आणलें असतां त्यांसही वाईट वाटूं नये. बालविधवांचा दुःखाक्रोश कानांनीं ऐकवत नाहीं म्हणून शास्त्रकर्त्यांच्या व भटांच्या नांवानें नेहमीं खडे फोडून ते दुष्ट, पक्षपाती, कोत्या समजुतीचे व आपमतलबी म्हणून हांका मारायच्या व देशकार्यरूप नौकेचें सुकाणूं स्वतः हातीं धरायचें; पण पुढें लवकरच आपला कपटकोप, लोककल्याणाविषयींची कळकळ, बालविधवांस दिलेलें आश्वासन चटसारें क्षणांत एकीकडे गुंडाळून ठेवून जहाजचें जहाज समुद्राच्या तळीं बसवितांना मनांत शंका सुद्धां आणायची नाहीं! जुन्या धर्माची लाज वाटून मोठा समाज जमवून त्यांत मोठ्या समारंभानें ईश्वराविषयीं प्रेम, मनुष्यमात्राविषयीं बंधुप्रीति, वगैरे भाव पूर्ण दाखवून खळखळ रडायचें पण तेथून निघालें कीं लागलेंच याच्यावर तोंड टाक, त्याच्या नाशाचा उद्योग कर, वगैरे अंगांत भिनलेलें दुष्टत्व प्रगट झालेंच. याप्रमाणें शेंकडों कुलंगडीं जीं आमच्या नव्या मंडळींत सर्वांस ढळढळीत दिसत आहेत तींच तेवढीं लपवून ठेवण्याचें कोणी सत्यपक्षपाती व न्याय्य मनुष्य पतकरावयाचा नाहीं. या उपहासापासून उपयोग एवढाच आहे कीं जे लोक इतःपर देशहिताच्या उलाढालींत पुढारीपणा घेऊं पाहती ते पूर्वींप्रमाणें खुशाल मौजेखातर तें काम हातीं घेणार नाहींत. आमच्या बुद्धीनें आम्हांस जें खरें भासलें तें जाहीर करण्यास आम्हीं कोणाचेंही भय किंवा धाक मनांत तिळभरही बाळगणार नाहीं."

( ३ )

'विनोदमहदाख्यायिका' या सदराखालीं ३७ व्या अंकांत 'नवी प्रीत' या मथळ्याखालीं पुढील गोष्ट दिली आहे:—

"आम्ही भरतखंडवासी लोक अर्धेमुर्धे रानटीच आहों व आम्ही आपल्या बायकांस पशूंप्रमाणें वागवितों हें त्याचें एक मोठें प्रमाण होय,

ी पाश्चात्यांची समजूत ! पुढील गोष्टीवरून जॉन्सनचें वर्तन आमच्या धारलेल्या स्त्रीजितबंधूसीं कितपत जमून होतें हें सर्वांच्या लक्ष्यांत सहज ाल्यावांचून राहणार नाहीं ! ख्रिस्ती लोकांचा पाणिग्रहणविधि देवळांत होत असतो. त्याप्रमाणें नेमलेल्या दिवशीं प्रस्तुत वधूवरें कांहींसें दूर देऊळ होतें तिकडे घोड्यावर बसून निघालीं. त्या प्रसंगींचा वृत्तांत खुद्द जॉन्सननें आपल्या प्रिय शिष्यास येणेंप्रमाणें निवेदन केला:—' माझ्या बायकोनें जुन्या कादंबऱ्या पुष्कळ वाचल्या होत्या, व त्यांनीं तिचें डोकें फिरून तीस असें वाटूं लागलें होतें कीं बायको बाणेदार म्हटली कीं तिनें आपल्या नवऱ्यास दारच्या कुत्र्याप्रमाणें वागविलें पाहिजे, असें करील तरच ती बायको ! असें वाटून तिनें मला प्रथम सांगितलें कीं, तुम्ही घोडा फार जलद हांकतां, माझ्यानें तुमच्याबरोबर येववत नाहीं. हें ऐकतांच मीं लगाम आंखडला व हळूहळू चालायला लागलों. पण ती पुन: म्हणत्ये काय, अहो ! किती हळू चालणार तुम्ही ? तुमच्याबरोबर कुणीं रेंगाळत बसावें ? हें ऐकतांच मीं तिचा मतलब जाणला व मनांत गांठ बांधली कीं ही एव्हांपासून डोक्यावर बसूं पाहणार ! तर हें अगदीं पयोगी नाहीं. मग तत्क्षणींच मीं घोड्यास टांच दिली व तेव्हांच पार दिसेनासा झालों. त्या रस्त्याच्या दोहों बाजूंस कुंपण होतें, तेव्हां मीं निसटून गेलों तरी ही रस्ता चुकणार नाहीं हें मला पक्कें माहीत होतें. पुढें पुढें हळूं हळूं चालायला लागून ती मला येऊन मिळेसें मी केलें. ती जवळ आली तों तिच्या डोळ्यांवाटें अश्रु चालले होते ! '

( ४ )

अंक ४३ मध्यें ' भाषापरिज्ञान ' या सदराखालीं पुढील प्रकार आहेत:—

**पांढरें उखळ**—या शब्दांचा उपयोग ' आकस्मिक धनलाभ ' या अर्थीं करितात, जसें ' यंदां दुष्काळामुळें रेल्वे कंपनीचें उखळ पांढरें झालें आहे. ' हा प्रयोग मूळचा देशावरील होय. देशावर जोंधळा, हरबरा वगैरे उत्तरधान्येंच मुख्यत: पिकत असल्यामुळं त्यांवरच प्राय: लोकांचा निर्वाह बारमहा होत असतो. कोंकणांतलें व मावळांतले तांदूळ यांचा पुरवठा तिकडे बेताबाताचाच असल्यामुळें कधीं सणासुदी तांदूळ बाहेर निघावयाचे. तेव्हां त्या दिवशीं मात्र अर्थात उखळ पांढरें !

भिक्षांदी—हा शब्द ' झोळी, चौपदरी ' 'अठरा खुंटाची जहागीर ' या शब्दांप्रमाणें ' माधुकरी ' चा वाचक आहे—जसें ' या वयांत तुला इतका सोंगट्यांचा चाळा मग पुढें भिक्षांदी करावयाची आहे वाटतें' आतां हा जो स्त्रीलिंगी ईकारांत शब्द वरील अर्थीं खासा प्रचारांत येऊन व्युत्पत्तिसिद्ध शब्दाप्रमाणें भाषेमध्यें सुप्रतिष्ठित होऊन बसला आहे याची जातकुळी जर पाहिली तर काय लटपट झाली आहे ती तेव्हांच लक्षांत येईल. माधुकऱ्यांचा दररोजचा भिक्षामंत्र सर्वत्र प्रसिद्धच आहे— ' ओं भवति भिक्षां देहि ' ( हे बाई ! भिक्षा घाल ). तेव्हां ' भिक्षां देहि ' या संस्कृत शब्दाचें चमत्कारिक रूपांतर होतां होतां ' भिक्षांदी असें रूप सरतेशेवटीं होऊन राहिलें.

या शब्दावरील टीपेंत मालाकार पुन्हां लिहितातः ' अर्वाचीनकाळीं मूळ संस्कृताचा लोकभाषेत राहिलेला मागमूस काय तो वरीलच होय ! पहिल्या ' भवति ' शब्दावरून पूर्वीही आतांप्रमाणें पाककर्माकडे स्त्रियांचीच योजना असे असें दिसतें. पण आतां वेळेनुसार अशी मौज होते कीं, माधुकऱ्यानें ' भवति ' पदानें संबोधन केलें असतां पंचा लावलेला ठोल्या आचारी ' भवती ' म्हणून बाहेर येतो !! '

( ५ )

अंक ७३ मध्यें ' सुभाषित या मथळ्याखालीं पुढील श्लोक भाषांरासह दिला आहेः—

नैषां संध्याविधिरविकलो नाच्युतार्चापि सांगा
न स्वे काले हवननियमो नापि वेदार्थचिंता ।
न क्षुद्वेलानियतमशनं नापि निद्रावकाशो
न द्वौ लोकावपि तनुभृतां राजसेवापराणाम् ॥

" जे राजसेवेत नियुक्त झालेले त्यांची संध्या पुरती व्हावयाची नाहीं, देवपूजा धड उरकावयाची नाही, यथाकालीं होमहवन घडावयाचें नाहीं वेदार्थाचें मनन करण्यास त्यास अवकाश नाहीं, वेळेवर जेवण नाहीं, झोंपही नाहीं—सारांश, त्या हतभाग्यांस इहलोकीचें सुख लाभत नाहीं परलोकीचेंही नाहीं. "



# पांगारकरांची पुस्तकें.

१. **भक्तिमार्गप्रदीपः**—( आवृत्ति दहावी ) हें पुस्तक अत्यंत लोक-झालें असून महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांच्या नित्यपाठांतलें होऊन बसलें हे. हें धर्मशिक्षणाची उत्तम कामगिरी करीत आहे. किं. ०८ रजि. ही. पी. नें ०११.

२ **मोरोपंत–चरित्र आणि काव्यविवेचनः**—हा ६३० पृष्ठांचा ग्रंथ ठे शोध व परिश्रम घेऊन तयार केला असून तो विद्वन्मान्य झाला . यांत पंतांचें समग्र चरित्र दिलें असून त्यांच्या कवितेंतील उत्कृष्ट ांचें मार्मिक विवरण केलें आहे. किं. रु. २०४.

३ **मोरोपंती वेंचे** ( आवृत्ति दुसरी ):—पंतांच्या कवितेंतले विविध षयांवरचे विविध प्रकारचे निवडक वेंचे यांत दिले असून पंतांच्या कवितासमुद्राचें आलोडन केल्याचें आयतें फळ यानें मिळणार आहे. प्रथम कविताशास्त्रावर विस्तृत प्रस्तावना दिली असून पंतांचें चरित्र संक्षे-पानें दिलें आहे. किं. रु. १०१२.

४. **श्रीज्ञानेश्वरमहाराजः**—चरित्र आणि काव्यविवेचन. ह्यांत ज्ञानो-रायांचें समग्र चरित्र साधार दिलें असून उत्तरार्धांत त्यांच्या ग्रंथांतील वेंचे विवरणासह दिले आहेत. किं. रु. १ र. व्ही. पीनें रु.१०३

. **श्रीएकनाथचरित्रः**—एकनाथमहाराजांचें प्रेमळ व उदात्त चरित्र ११ प्रकरणांत दिलें आहे. किं. ०६.

६. **कविरामायणः**—संस्कृत व प्राकृत रामायणें व शेंकडों स्फुट प्रकरणें यांतून उत्कृष्ट वेंचे संगतवार दिले असून हें रामायण तयार केले आहे. किं. ०४.

७. **पारिजातकाचीं फुलें**:—( आवृत्ति तिसरी ) परमार्थविचारांची तति उत्पन्न करणारे अर्थगंभीर विचार [ Maxims ] विषयवारीनें े असल्यामुळें पुस्तक रमणीय व उपयुक्त झालें आहे. किं. ०८.

८. **नारदभक्तिसूत्रें**:—( आवृत्ति तिसरी ) हीं ८४ संस्कृत सूत्रें, चा अर्थ व त्यावरील विस्तृत विवरण पाहून भक्तिशास्त्राचा यांत ांगोपांग वि चार केलेला आढळून वाचकांस भक्तिप्रेमोदधि सांपडल्याचा ानं होणार आहे. किं. ०८.

